# नवभारत

एप्रिल २०१२

## कवी गोविंद, स्वा. सावरकर आणि कुसुमाग्रजांची राष्ट्रीय जाणिवेची कविता : अनुबंध

## एकोणिसाव्या शतकातील मराठी कादंबरीविषयक अभिरुची

## नवशिक्षणाची नांदी







अनुक्रमणिका










नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






# आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६१ वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळ्यांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदानप्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारता' ने कार्य करीत राहावे, असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित वाङ्मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारता'ने पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयांतील ग्रंथालयात अद्ययावत पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील, असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयांतून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांनी आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारता'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारता'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल, त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रु. ३००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारता'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

– संपादक मंडळ

# लेखकांस आवाहन

*'नवभारत' मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण 'नवभारत' कडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी, अशी विनंती आहे.*

१. *आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.*

२. *आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील, ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यांसह द्यावेत.*

३. *महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही, याची स्पष्ट कल्पना 'नवभारत' च्या संपादकांना द्यावी.*

४. *'नवभारत' मध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो. त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात 'नवभारत' मध्ये येईल किंवा येणार नाही, हे यथावकाश कळविले जाईल, याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.*

*आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.*

*– संपादक मंडळ*

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६५ । अंक ७ । एप्रिल २०१२
चैत्र/वैशाख शके १९३३
वार्षिक वर्गणी ३०० रुपये
या अंकाची किंमत रु. २०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संग्रहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा, या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील, अशी काळजी घेतली जाईल.

---

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.



अनुक्रमणिका








# नवभारत

## एप्रिल २०१२

## अनुक्रमणिका



**टीप :**

नवभारत मासिक मार्च २०१२ मधील 'दंडनीयता आणि क्षमाशीलता' या 'श्री. बाबूराव चंदावार' यांच्या लेखामध्ये पृ. क्र. २० वर "इस्लामचा भक्तिमार्ग अर्थातच ईश्वरनिष्ठेतला नाही तरीही बौद्धभिक्खू व जैनसाधूंच्या परिव्राजकतेतूनच तो अभिव्यक्त झालेला आहे." असे छापले गेलेले आहे, हे चुकीचे आहे. खालीलप्रमाणे ती दुरुस्ती करण्यात येत आहे-

"इस्लामचा भक्तिमार्ग फकिरांच्या परिव्राजकवृत्ती व आचरणातून अभिव्यक्त होतो. बौद्धांचा व जैनांचा भक्तिमार्ग अर्थातच ईश्वरनिष्ठेतला नाही. तरीही बौद्धभिक्खू व जैनसाधूंच्या परिव्राजकतेतूनच तो अभिव्यक्त झालेला आहे."

# कवी गोविंद, स्वा. सावरकर आणि कुसुमाग्रजांची राष्ट्रीय जाणिवेची कविता : अनुबंध

प्राचार्य डॉ. पंडितराव पवार

**राष्ट्रीय जाणिवेच्या कवितेची पूर्वपीठिका :**

कोणत्याही वाङ्मयीन प्रवाहांवर तत्कालीन काळाचे-युगधर्माचे पडसाद उमटलेले असतात, हे आजवर विविध वाङ्मयप्रवाहांचे सिंहावलोकन केल्यावर ध्यानी येते. कथा, कविता, कादंबरी, नाटक, चरित्र-आत्मचरित्र आणि नियतकालिकांतील विविध लेखन तपासल्यावर वरील विधानाची सत्यता पटू लागते. त्या त्या काळातील रूढि-परंपरा, सामाजिक प्रश्न, राजकीय चळवळी, राज्य-राष्ट्रीय पातळीवरील विविध ज्वलंत प्रश्न आणि त्यां-संबंधीच्या घडामोडी यांचे प्रतिबिंब त्या त्या वाङ्मयात कधी जाणीवपूर्वक तर कधी अनाहूतपणे पडलेले असते.

व्यापाराच्या निमित्ताने आलेल्या ब्रिटिशांनी हळूहळू आपल्या देशात पाय पसरवून ईस्ट इंडिया कंपनीच्या माध्यमातून आपले बस्तान बसविले. लोकांना काही दिखाऊ प्रलोभने दाखवून, शिक्षण, रेल्वे, पोस्टसेवा, महसूल इत्यादींच्या माध्यमातून आपले कायदेकानून तयार करून ते शासक बनले. आणि तेथूनच आपल्या साम्राज्य-वादी कृतीची वाघनखे काढून भारतीय जनतेची अस्मिता हळूहळू नष्ट करून छळावयास सुरुवात केली. एकंदरीतच इ.स. १८१८ ते १९४७ पर्यंतच्या या राजकीय युगाच्या घडामोडी, भारतीयांचा असंतोष, भारत छोडो आंदोलन, राजकीय क्रांतिकारकांचे हौतात्म्य आणि स्वातंत्र्यप्राप्तीसाठी उभी केलेली सर्वंकष चळवळ यांचे प्रतिबिंब मराठी साहित्यातील इतर वाङ्मयीन प्रकारांप्रमाणे कवितेतही उमटलेले ठळकपणे दिसते. लोकमान्य टिळक, नेताजी सुभाषचंद्र बोस, महात्मा गांधी आणि त्यांचे सहकारी यांनी उभी केलेली स्वातंत्र्याची चळवळ; मदनलाल धिंग्रा, भगतसिंग, राजगुरू, सुखदेव, शिरीषकुमार आणि इतर अनेक क्रांतिकारकांचे हौतात्म्य; सशस्त्र क्रांतीसाठी केलेले आवाहन आणि असहकाराचे अहिंसामार्गाचे आंदोलन असे अनेक प्रयत्न स्वातंत्र्यप्राप्तीसाठी झाले. या सर्व चळवळींचे क्रांतिप्रवण चित्रण या काळात मराठी कवितेत आलेले आहे. १८५८ च्या स्वातंत्र्यसमराची पार्श्वभूमीही या स्वातंत्र्यचळवळीमागे होती.

कवी विनायक, स्वातंत्र्यशाहीर कवी गोविंद, स्वातंत्र्यवीर वि. दा. सावरकर, कविवर्य कुसुमाग्रज, वा. रा. कांत, श्रीकृष्ण पोवळ, अनिल यांसारख्या कवींनी राष्ट्रीय जाणिवेच्या ओजस्वी आणि भारतीय रसिक मनाला भारावून टाकणारी कविता लिहिली. केशवसुतसंप्रदाया-तील कवी विनायक यांच्या कवितेचा आशय पारतंत्र्याचा विनाश आणि राष्ट्रीयता या दोन घटकांनी भरून राहिलेला आहे. त्यामुळेच सुप्रसिद्ध समीक्षक भा. श्री. पंडित यांनी कवी विनायकांना 'मराठी राष्ट्रीय कवितेचे पहिले आणि श्रेष्ठ उद्गाते' म्हटले आहे. कवी विनायकांच्या गणेशपूजन, महाराष्ट्रलक्ष्मी, शिवसंदेश, प्रो. छत्र्यांचा केसरी इत्यादी कवितांतील राष्ट्रीय शिक्षण, स्वदेशी माला-साठीचा आग्रह आणि परकीय मालावरील बहिष्कार इत्यादी विषयांतून त्यांच्या राष्ट्रप्रेमाचे चिरंतन दर्शन घडते. त्या काळात लो. टिळकांचा 'केसरी' आणि शि. म. परांजपे यांच्या 'काळ' वृत्तपत्रांतून परकीय सत्तेविरुद्धचा आवाज तर्कशुद्ध वैचारिक पातळीवर आणि वक्रोक्तिपूर्ण शैलीतून घुमत होता. क्रूरकर्मा रॅण्डचा खून आणि चापेकर-बंधूंना झालेली फाशीची शिक्षा या सर्व घटनांचे पडसाद विनायकांच्या कवितेत उमटलेले आहेत. देशभक्त क्रांति-कारकांना मिळालेल्या शिक्षेचे वर्णन कवी उपरोधाने करतो.

> 'देशभक्ता प्रासाद बंदिशाला।
> शृखंलांच्या गुंफिल्या पुष्पमाला
> चिता सिंहासन शूल राजदंड।
> मृत्यू दैवत दे अमरता उदंड'[१]

तुरुंग हा प्रासाद मानून बेड्या ह्या फुलांच्या माळाच समजून चितेच्या सिंहासनावर बसणाऱ्या देशभक्तांच्या मृत्यूचा हा अपूर्व सोहळा कवीने वर्णिला आहे. विनायकांच्या कवितेत यवनांच्या जुलमाबरोबरच ब्रिटिश

अनुक्रमणिका






सत्ता, त्यांची क्रूर न्यायव्यवस्था यांवरही आपल्या कवितेत आसूड ओढले आहेत. 'पुनःपुन्हा परचक्राने नाडिली बिचारी। दीर्घकाळ खचली होती पारतंत्र्य भारी' अशी महाराष्ट्रलक्ष्मीची अवस्था त्यांनी आपल्या कवितेतून वर्णिली आहे.

कवी विनायकांच्या नंतर स्वातंत्र्यशाहीर कवी गोविंद (जन्म ९ फेब्रुवारी १८७४ – मृत्यू २८ फेब्रुवारी १९२६), स्वातंत्र्यवीर वि. दा. सावरकर (जन्म २८ मे १८८३ - मृत्यू २६ फेब्रुवारी १९६६) आणि कविवर्य कुसुमाग्रज (जन्म २७ फेब्रुवारी १९१२ - मृत्यू १० मार्च १९९९) या नाशिकस्थित तीन कवींची राष्ट्रीय जाणिवेची कविता मराठी कवितेच्या प्रवाहात अधोरेखित झालेली आहे. ज्येष्ठतेच्या दृष्टीने कवी गोविंद हे टिळकयुगात वावरत होते. स्वा. सावरकर हे लो. टिळक आणि गांधीयुगाचे साक्षी होते. कुसुमाग्रजांच्या काळात लो. टिळकांचा प्रभाव कमी झालेला असला, तरी महात्मा गांधींचे अहिंसेचे राजकारण ते अनुभवत होते. त्यामुळे त्यांची राष्ट्रीय कविताही तरुणांची मने प्रज्ज्वलित करीत होती. भारतीय स्वातंत्र्ययुद्धाबरोबरच भारत-चीन (१९६२), भारत-पाकिस्तान (१९७१) ही स्वातंत्र्योत्तर युद्धेही कुसुमाग्रजांच्या कवितेचा विषय झालेली आहेत. स्वा. सावरकरांनी भारत-चीन युद्ध पाहिले असले तरी, त्याचे चित्रण त्यांच्या कवितेत आलेले दिसत नाही. कारण तो त्यांच्या जीवनाचा उत्तरार्ध होता. कवी गोविंद आणि स्वा. सावरकर यांच्या कवितेच्या प्रेरणा प्रामुख्याने ब्रिटिश राजवट आणि तिच्या भारतीय जनतेवरील जुलमांची प्रतिक्रिया आहे. कविवर्य कुसुमाग्रज यांची कविता साधारणतः १९३२-३३ नंतर उदयास आली. पहिल्या आणि दुसऱ्या महायुद्धांचा काळ, स्वातंत्र्याची चळवळ आणि ब्रिटिशांचा साम्राज्यवाद, भांडवलशाहीची प्रतिक्रिया म्हणून उदयास आलेला साम्यवाद, रशियातील साम्यवाद, समाजातील श्रीमंत-गरीब माणसांतील विषमतेविरुद्धचा संघर्ष यांसारख्या विषयांनाही त्यांच्या कवितेत स्थान मिळालेले आहे. कवी गोविंदांना वि. दा. सावरकरांचा प्रत्यक्ष सहवास लाभला होता. कवी कुसुमाग्रजही सावरकरांची कविता अनुभवत होते. स्वा. सावरकरांसंबंधी त्यांनी प्रासंगिक लेखनही केले आहे. कवी गोविंद आणि स्वा. सावरकर यांची विचारधारा अधिक जवळची होती. त्यांना एकमेकांचा सहवासही लाभला होता. त्यामुळेच कवी गोविंदांची कविता अधिक धिटाईने लोकमानसात आली. या दोघांची कविता सरळ-सरळ जनमताला आवाहन करणारी होती. कविवर्य कुसुमाग्रजांची काही कविता लोकभावनेबरोबरच क्रांति-कारकांनाही क्रांतिप्रवण करणारी होती, तर काही कविता रूपकात्मक पातळीवर कल्पनासृष्टीच्या माध्यमातून समूहाला सजग करीत होती. त्यामुळे या तीनही कवींचा पिंड हा राष्ट्रप्रेमातून स्वातंत्र्यप्राप्तीसाठी आवाहन करीत होता, असे म्हणता येते. आणि हे तीनही कवी मध्यम-वर्गीयच असल्याने समाजातील मध्यमवर्गास त्यांची भाषा सहजपणे आकळत होती. वरील तीनही कवींनी गोदेच्या पाण्याचा खळखळाट ऐकला होता आणि तिच्या खोलवर असलेल्या पाण्यातील अध्यात्माचा सुगंधही त्यांनी अनुभवला होता. त्यामुळे या कवींच्या कवितांत यवनां-विरुद्धच्या आवाजाबरोबर ब्रिटिश सत्तेविरुद्धची चीडही व्यक्त झाली आहे. त्यांच्या या राष्ट्रीय जाणिवेच्या कवितां-बरोबरच समाजोद्धार, समाजातील आदर्श व्यक्तिमत्त्वे, समतेचा घोष आणि अन्य विषयांवरील कवितांचे दालनही समृद्ध आहे.

साधारणतः १८९९-१९०० च्या दरम्यान स्वा. सावरकर आणि त्यांच्या मित्रांनी 'मित्रमेळा' नावाची संस्था स्थापन केली. या काळात ब्रिटिश सत्तेचा अंमल जोरात होता. परंतु 'मित्रमेळा' हे नाव कुणाला आक्षेपार्ह वाटणार नाही, अशी संस्थापकांची धारणा होती. लो. टिळकांनी सुरू केलेल्या शिवजयंती आणि गणपती-उत्सव यांत 'मित्रमेळा' सहभागी होऊ लागला. या उत्सवां-मध्ये कवी गोविंदांची कविता ते स्वतः आणि इतरही कार्यकर्ते गात असत. पुढे १९०४ मध्ये स्वा. सावरकरांनी महाराष्ट्रातील आपल्या सहकाऱ्यांना नाशिक येथे बोलावून 'मित्रमेळा' या संस्थेचे रूपांतर 'अभिनव भारत' असे केले. साधारणतः १९०७ पर्यंत या संस्थेचे कार्य जोमाने चालले. याच दरम्यान कवी गोविंदांची राष्ट्रीय कविताही फुलत होती. या संस्थेच्या कार्यात स्वा. सावरकरांनी त्यांना 'स्वातंत्र्यशाहीर' हे बिरुद गौरवाने बहाल केले आणि त्यांच्या कवितेला खतपाणीही घातले. एकंदरीत स्वा. सावरकरांच्या 'अभिनव भारत' संस्थेशी कवी

गोविंदांच्या कवितेची नाळ जोडलेली आहे. त्यामुळे या दोनही कवींचे संबंध आणि विचारबंध घट्ट जोडलेले आहेत.

साधारणतः १९३०-३१ च्या सुमारास नाशिक येथेच जोगळेकर, केळकर, पोळ, खरे, माधव मनोहर आणि कुसुमाग्रज या तरुण कविमित्रांनी 'ध्रुव मंडळ' स्थापन केले. त्यात काव्य-वाङ्मयविषयक चर्चा घडत. त्यातच कुसुमाग्रजांचा 'जीवन लहरी' हा पहिला काव्यसंग्रह १९३३ मध्ये प्रकाशित झाला. 'जीवन लहरी हे त्या काळचे आणि मंडळाचे मजजवळ उरलेले एक स्मृतिचिन्ह होय' – असे कुसुमाग्रजांनी म्हटले आहे.[२] याचाच अर्थ कवी गोविंदांप्रमाणे एका वाङ्मय मंडळात कुसुमाग्रजांची कविता फुललेली दिसते. नाशिकमधील या दोनही कवींच्या काही कवितांच्या निर्मितीची स्थळं नाशिकमधील दोन मंडळं आहेत, हा एक योगायोग असावा. कुसुमाग्रजांची कविता कवी गोविंद आणि स्वा. सावरकर यांच्यानंतरची असली, तरी कुसुमाग्रजांनी वरील दोनही कवींच्या राष्ट्रीय जाणिवा प्रत्यक्ष-अप्रत्यक्षपणे स्वीकारल्या असणे शक्य आहे. कारण तो धागा त्यांच्या 'विशाखा' या संग्रहातील काही कवितांतून जोडलेला जाणवतो. मात्र कवी गोविंदांच्या मृत्यूच्या वेळी कुसुमाग्रज साधारणतः १४-१५ वर्षांचे असावेत. म्हणून त्यांची प्रत्यक्ष भेट झाली होती किंवा नाही, हे सांगता येत नाही.

**कवी गोविंदांची कृतिप्रेरक राष्ट्रीय कविता :**

कवी गोविंद हे स्वा. सावरकरांपेक्षा वयाने बारा-तेरा वर्षांनी मोठे होते. परंतु सावरकर हे कविप्रवृत्तीचे असल्याने शाळेत असताना कविता लिहीत होते, असे त्यांच्या आत्मचरित्रातून समजते. नाशिकच्या तिळभांडेश्वर गल्लीत दातारांच्या घरात सावरकरबंधू राहत होते. कवी गोविंद लहानपणी आजारात पंगू झाले. त्यामुळे त्यांना कुणाच्या तरी पाठीवर बसून बाहेर पडावे लागे. अशा अपंग कवीची प्रतिभा मात्र तल्लख होती. त्यातूनच त्यांनी काही लावण्याकवने केली. काव्याच्या या गोडीने ते सावरकरांच्या जवळ आले. अखेरपर्यंत त्यांचे ऋणानुबंध कायम राहिले. एवढेच नव्हे तर चांगल्या काव्यासाठी आवश्यक असणारे धडेही सावरकरांनी त्यांना दिले. त्यातूनच त्यांची राष्ट्रीय कविता बहरली. १९०९ साली सावरकरांचे बंधू बाबाराव सावरकरांवर देशद्रोहाचा आणि ब्रिटिश सरकारविरुद्ध बंड केल्याचा आरोप ठेवून खटला भरला गेला. त्या खटल्यात पुराव्यासाठी कवी गोविंदांच्या कविता दाखल केल्या गेल्या. आणि परिणामी बाबाराव सावरकरांना जन्मठेपेची शिक्षा झाली. अशा रीतीने सावरकर बंधू आणि कवी गोविंदांच्या कवितेचा दृढ संबंध आहे.

१९०१ ते १९०७ या काळात भारतीय राजकीय चळवळींनी खूपच जोर धरलेला होता. कवी गोविंद हेही सामान्य परतंत्र भारतीय माणसाप्रमाणे स्वातंत्र्याची स्वप्ने पाहत होते. अशा स्वप्ने पाहणाऱ्या, सुस्तावलेल्या माणसांच्या डोळ्यात अंजन घालण्याची गरज होती. लो. टिळकांनी स्वातंत्र्यमंदिराची पायाभरणी सुरू केली होती. त्यांच्या कार्यात क्रांतिप्रवण अशा लोकसमूहाची गरज होती. अशा वेळी कवी गोविंदांच्या कवितेने स्वातंत्र्य-यज्ञात क्रांतीचे निखारे टाकले. गणेशोत्सव, शिवाजीमहाराज उत्सव या उपक्रमांत त्यांनी ऐतिहासिक, राजकीय, पौराणिक घटनांच्या आधारे बाजीप्रभूचा पोवाडा, अफझल-खानाचा पोवाडा, स्वा. सावरकरांचा सिंहगडचा पोवाडा अशी कवने सादर करून लोकांची मने ब्रिटिशांविरुद्ध प्रज्वलित केली. या निमित्ताने कवी गोविंदांच्या प्रतिभेला नवनवी पालवी फुटली. त्यांची ही कवने म्हणजे 'स्वातंत्र्यलढ्याच्या यज्ञकुंडात टाकलेले जळजळीत निखारे होते' असे कविवर्य कुसुमाग्रजांनी कवी गोविंद यांच्या निवडक कवितांचा संग्रह प्रकाशित करताना म्हटले आहे. याच संग्रहात कुसुमाग्रज लिहितात, 'सावरकरांसारख्या क्रांतिवीराने ज्यांना खांद्यावर वाहून नेले असा हा प्रतिभाशाली अपंग कवी काव्यात आणि काव्यासाठी जगणारा. आणि जगणे स्वतंत्रतेच्या पायावर अर्पण करणारा'[३] – या उद्‌गारांतून कुसुमाग्रजांची कवी गोविंद यांची कविता निवडून प्रकाशित करण्याची तळमळ, सावरकरांची कवी गोविंदां-बद्दल व्यक्त केलेली आत्मीयता यातून या तीनही कवींचे काव्यात्म पातळीवरील अनुबंध स्पष्ट होण्यास मदत होते.

कवी गोविंदाची राष्ट्रीय कविता ही ब्रिटिश सत्ते-विरुद्धच्या संघर्षात्मक कालखंडाचे ज्वलंत चित्रण साकारणारी आहे. 'रणाविण स्वातंत्र्य कोणा मिळाले?' ही कृतिप्रेरक भाषा भारतीय जनतेला उद्देशून आहे. आणि

अनुक्रमणिका

ब्रिटिश सत्तेला उलथून पाडण्यासाठी प्रत्यक्ष स्वातंत्र्ययुद्ध आता अटळ आहे, यावर त्यांची दृढ श्रद्धा दिसते. म्हणून ते प्रभु रामरायाची प्रार्थना करताना म्हणतात,

'हे घनश्याम श्रीराम मदात्माराम
स्वातंत्र्य सकल सुखनिधी समर्पुनि कधी पुरविशिल काम।। ध्रु ।।
त्वा अमेरिका सुखविली। स्वातंत्र्ये।
भू-जपानची नटवीली। स्वातंत्र्ये।
इटलीही तशी हसवीली। स्वातंत्र्ये। (पृ. ३४)
मग आर्यभूच का पारतंत्र्य-कर्दमी फसविली राम।।१।।'

आपल्या देशातील जनता पारतंत्र्याच्या कर्दमात खितपत पडली आहे, याचे शल्य कवीस बोचते. पाश्चात्त्य राष्ट्रांनी मात्र संघर्ष आणि सशस्त्र युद्ध करून स्वातंत्र्य मिळविले. मग श्रीरामांनी आमचे राष्ट्रही स्वतंत्र करण्याचे बळ आम्हास द्यावे, हीच प्रार्थना ते करतात. रामायण, महाभारत यांच्या दाखल्यातून न्यायाची आणि दास्यमुक्तीची त्यांची उदाहरणे भारतीय जनतेच्या हृदयाला हात घालणारी आहेत.

'रणावीण स्वातंत्र्य कोणा मिळाले?' असा प्रश्न ते भारतीय जनतेला उच्च रवाने करतात. त्यासाठी त्यांनी पुन्हा नेदरलॅण्ड, स्वित्झर्लॅण्ड, टायरोल, इटली इत्यादी देशांतील सशस्त्र क्रांतीचे दाखले दिले आहेत. त्याचप्रमाणे यवनांच्या विरुद्ध रण करण्याची श्री शिवाजीमहाराजांना हौस होती काय? असा प्रश्न विचारून 'रणावीण स्वातंत्र्य कोणा मिळाले?' हा प्रश्न पुनःपुन्हा करून लोकांच्या भावना चेतविल्या आहेत. आणि अखेरीस,

'रणावीण स्वातंत्र्य कोणा मिळेना।
असा भूतकालीन सिद्धांत जाणा।
स्वराज्येच्छुने पाहिजे युद्ध केले।
रणावीण स्वातंत्र्य कोणा मिळाले?' (पृ. ३६)

या काव्यपंक्तींतून कवी गोविंदांनी सरळसरळ सशस्त्र क्रांतियुद्धाचा पुकारा केला आहे. आणि अशा सशस्त्र युद्धातून पाश्चात्त्य देशांतील जनतेने आपली मुक्ती करून घेतली आहे, हा इतिहास ते सांगायला विसरत नाहीत.

'लोकमान्य टिळकांची भूपाळी' मधूनही लो. टिळकांचा कर्मयोग आणि त्यांची विद्वत्ता यांचा गौरव करताना कवी आदराने म्हणतो,

'मुक्या मनाने किति उधळावे शब्दांचे बुडबुडे
तुझ्यावर। शब्दांचे बुडबुडे
तुझे पवाडे गातिल पुढती तोफांचे चौघडे'(पृ. ४५)

या काव्यपंक्तींतून लो. टिळकांचे भारतीय स्वातंत्र्ययुद्धातील कर्तृत्व आणि भारतीयांच्या मनात असणारी त्यांच्याबद्दलची श्रद्धाच व्यक्त झाली आहे. भारतमातेच्या हाता-पायांतील गुलामगिरीच्या बेड्या पाहून कवीचे मन हळहळते. स्वयं-प्रकाशित अशी स्वातंत्र्योत्तर कवचकुंडलांची जागा पार-तंत्र्याच्या साखळ्यांनी घ्यावी, याचे कवीला मनस्वी दुःख होते. हे दुःख सर्वसामान्य भारतीय माणसाला आहे. म्हणून कवी त्याच दुःखी अंतःकरणाने उद्गारतो,

'आर्यबंधूंनो। उपाय काही करा करा रे।
त्वरे। बंधूनो!
नाहीतर तत्काल काल इस करील मृण्मय बरे!'

भारतमातेचा सर्वनाश होण्यापूर्वी भारतीय स्वातंत्र्याच्या यज्ञात उड्या घेण्याचेच कवीचे हे आवाहन आहे.

स्वातंत्र्यतेला रमणी कल्पून कवीने पुन्हा सशस्त्र क्रांतीचाच मंत्र उच्चारला आहे.

'जो ढाल-खड्ग नर त्याला।
अरिसवे रणांगणि लढला।
जयवंत होऊनी आला।
तो तुला आवडे सुगुणी।' (पृ. ४२)

शत्रूसंगे लढून जो तुझ्या गळ्यात विजयी माळ घालील तोच शूरवीर तुला आवडतो, अशा काव्यमय आणि वक्रोक्तिपूर्ण भाषेत कवीने सशस्त्र क्रांतीचा पुकारा पुन्हा केला आहे. स्वातंत्र्यलक्ष्मीच्या शोधार्थ निघालेला वीर वादळवाऱ्याला तोंड देऊन ध्येयमग्न होतो. म्हणून 'कारा-गृहाचे भय काय त्याला?' असाच प्रश्न कवी आवेशाने विचारतो.

'अंगद शिष्टाई' या संवादात्मक कवितेतूनही हाच स्वातंत्र्याचा ध्यास व्यक्त होतो. 'श्री जिजाबाईंचे बाल-शिवाजीसाठी अंगाईगीत' मधूनही कवीने देशशत्रूंचा नाश करण्याचेच बळ दिले आहे. त्यासाठीच 'मी वीर तुला बनवीन' ही जिजाऊमातेची प्रतिज्ञा आहे. त्यातूनच 'देशाचा पालनवाला। तो शिवाजी राजा झाला' ही अस्मिता कवी गोविंद व्यक्त करतात.

नरवीर तानाजीच्या पत्नीचा विलापदेखील तानाजीच्या

मृत्यूसाठी नव्हे, तर 'रणी झुंज स्वातंत्र्यास्तव झुंजताना' केलेल्या हौतात्म्याचा गर्व म्हणून ती कृतार्थ झाल्याचा निदर्शक आहे. प्रतापराव गुजरदेखील 'स्वातंत्र्याची उषा' पाहण्यासाठी स्वतःचा अंत घडविण्याची 'निमंत्रणे' प्रभूने करावी अशी त्यागाच्या भावनेतून प्रार्थना करतो. कवी गोविंदांनी शिवकालातील व्यक्तींच्या त्यागाची उदाहरणे-देखील भारतीयांची मने ब्रिटिश सत्तेविरुद्ध लढण्यासाठी तत्पर व्हावीत यासाठीच घेतली आहेत. कारण शिव-कालातही यवनांचे महाभयंकर जुलूम प्रजेवर होत होते. त्यासाठीच श्री शिवाजीमहाराजांनी 'स्वराज्य' स्थापनेचा चंग बांधला होता.

आता ब्रिटिशांच्या विरुद्ध आर्यबंधूंनी सर्वस्व अर्पण करण्याची कृती करण्यासाठी सिद्ध व्हावे, असेच कवी गोविंद यांना वाटते. लोकसमूहाने दास्यावरी युक्तीने जाळे टाकून मुक्तीचे मार्ग खुले करावेत. कारण 'हिंदभू वांछिते विगत स्वातंत्र्य ते ?' ही सर्व भारतीयांचीच भावना आहे. त्यासाठी आर्य तरुणांनी 'देऊ स्वप्राण, रक्षू भूप्राण तो' असा निर्धार करण्याची भाषा मराठी कवितेत प्रथमच आली आहे. राष्ट्रस्वातंत्र्यातून धर्मस्वातंत्र्य आणि त्यातून ज्ञानस्वातंत्र्यही मिळेल, म्हणून हिंदभूला 'सकलस्वातंत्र्य' हवे, हीच भावना कवीने व्यक्त केली आहे.

भारत देशाचे पौराणिक-ऐतिहासिक वैभव फार मोठे होते. परंतु पारतंत्र्याने त्याच्या वैभवाला दृष्ट लागली. काही स्वकीयही स्वार्थापोटी षंढ बनून परकीयांचे भाट झाले असले तरी, भारतीयांचे ओज, पराक्रम अद्याप संपलेला नाही हे परोपरीने सांगून,

'सदा मारता नाचे शौर्य तन मनी।
सर्व काल तुज ठायी शौर्य-सबलता'

हा आपल्या देशाबद्दलचा सार्थ अभिमान कवी व्यक्त करतो.

ब्रिटिशांनी भारतातील कच्चा माल इंग्लंडमध्ये नेऊन त्याचा पक्का माल बनवून भारत ही मोठी बाजारपेठ बनविली. प्रचंड पैसा गोळा करण्याची व्यापारी वृत्ती वाढीस लावली. त्यासाठी स्वदेशी मालाचा पुरस्कार करून ब्रिटिशांच्या स्वार्थी वृत्तीचा निषेधही कवी भारतीयांची 'कान उघाडणी' करताना म्हणतो,

'लोकांना तो स्वदेश सारा लुटुनि करू द्या साफ
साधुपणा भंगेल, तयावरि करू नका संताप'(पृ.७७)

ब्रिटिशांची लुटण्याची प्रवृत्ती पाहून भारतीयांनी खुशाल कंबरेला लंगोटी लावून, अंगाला राख फासून, हाती चिमटा घेऊन साधुवृत्ती धारण करावी, अशी उपरोधिक भाषा ते योजतात. शत्रू देश लुटत असताना त्यास विरोध करणे म्हणजे महापाप अशी भारतीयांची धारणा झाली आहे, असे उपरोधाने सांगून भारतीयांच्या डोळ्यात अंजन घालण्याचा प्रयत्न ते करतात. आणि शेवटी निदान परमेश्वराने तरी हिंदुस्थानचे रक्षण करावे, अशी प्रार्थनाही ते आपल्या कवितेतून करतात. परमेश्वराने आज्ञा दिली तर शत्रूला कंठस्नान घालून आमच्या रुधिराने स्वातंत्र्यते-लाही स्नान घालून आणि परकीयांच्या जोखडातून मुक्त होऊ असा निर्धार ते व्यक्त करतात. येथे स्वा. सावर-करांच्या 'तुजसाठी मरण ते जनन। तुजवीण जनन ते मरण' – या उक्तीचा प्रत्यय आल्याशिवाय राहत नाही. भारतभूमीला स्वतंत्रतेने दृढालिंगन द्यावे, हीच त्याचीही तळमळ होती.

कवी गोविंदांनी भारतीय स्वातंत्र्यासाठी आपली कविता कधी ओजस्वी शब्दांनी, कधी रामायण-महा-भारतातील दाखल्यांतून तर कधी ऐतिहासिक घटना-प्रसंगांतून भारतीयांना कृतिप्रेरक करण्यासाठीच लिहिलेली आहे, हे वरील प्रातिनिधिक उदाहरणांतून स्पष्ट होते. या संदर्भात सुप्रसिद्ध समीक्षक डॉ. सुधीर रसाळ म्हणतात, 'कवी गोविंदांची कविता ही कविता मात्र परिपूर्ण असे कृतिप्रेरक काव्य आहे. कारण ही कविता कवी गोविंदांच्या देशाबद्दलच्या, देशाच्या पारतंत्र्याबद्दलच्या आणि स्वातंत्र्या-बद्दलच्या उत्कट भाववृत्तींना अभिव्यक्त करते. कवी गोविंदांच्या श्रद्धा, निष्ठा, त्यांनी स्वीकारलेली मूल्ये या सर्वांचे प्रकटीकरण ही कविता करते.'[४] डॉ. रसाळ यांचे हे विवेचन कवी गोविंद यांच्या काव्याचे आणि व्यक्तिमत्वाचेही मर्म स्पष्ट करणारे आहे. भारतीय स्वातंत्र्यप्राप्तीची चळवळ, स्वा. सावरकरांचे विचार सामावून घेणारी ही कृतिप्रेरक कविता राष्ट्रीय कवितेचा खोल पाया आहे, असे म्हटले तर वावगे ठरू नये. त्यांच्या कवितेतील भारतीय संस्कृतीचा अभिमान आणि जाज्वल्य निष्ठा पानोपानी नजरेत भरते. ऐतिहासिक व्यक्तींबद्दलचा जिव्हाळा आणि तो व्यक्त करणारे प्रांजळ

शब्द यांमुळे ही कविता आर्यबंधूंना आणि राष्ट्रप्रेमी वाचकांना आपली कविता वाटावी, इतकी स्वदेश, स्वभाषा आणि अस्मिता जागी ठेवणारी आहे.

**हिंदभूची अस्मिता जागविणारी स्वा. सावरकरांची कविता :**

कोणत्याही राष्ट्राच्या अस्तित्वात आणि समाजाच्या विकासात सांस्कृतिक, आर्थिक आणि राष्ट्रीय जाणिवांना अव्वल स्थान असते. या जाणिवा अतिशय व्यापक स्वरूपात समाजाचे-राष्ट्राचे भरणपोषण करीत असतात. त्या त्या राष्ट्राला विशिष्ट असा सांस्कृतिक वारसा असतो. त्या त्या काळातील कलागुणांचा, भाषेचा, रूढि-परंपरांचा विकास हा त्या राष्ट्राचे सांस्कृतिक वैभव असते. त्यातून त्या समाजाची आपल्या राष्ट्राबद्दलची अस्मिता सिद्ध होत असते. ते वैभव आणि अस्मिता एखाद्या जुलमी राजवटीने उद्ध्वस्त करणे म्हणजे अशा जुलमी राजवटीच्या अहंकाराचे अघोरी रूप असते. त्यातून त्या वैभवसंपन्न देशाच्या अध:पतनाचा प्रवास सुरू होतो. ते अध:पतन जेव्हा राजकीय पातळीवरून सुरू होते, तेव्हा त्या देशातील जनतेला परवशतेच्या गुलामगिरीची शल्ये नामोहरम करतात. अशा वेळी प्रतिभावंत साहित्यिक, क्रांतिकारक विचारांचे जहाल विचारवंत यांनाच आपली लेखणी उचलावी लागते. त्या लेखण्यांना जेव्हा तलवारींचे स्वरूप प्राप्त होते, तेव्हाच लोकमत प्रज्वलित होते, असा इतिहास जागतिक पातळीवरही पहावयास मिळतो. उदा., फ्रेंच राज्यक्रांतीत तत्कालीन विचारवंतांच्या लेखणीने लोकमत प्रक्षुब्ध केले, तेव्हाच ती राज्यक्रांती यशस्वी झाली. अशी आणखीही उदाहरणे देता येण्यासारखी आहेत.

आपली मातृभूमी ही प्रत्येकालाच आईइतकीच प्रिय असते. त्या मातृभूमीचा, तिच्या वैभवाचा सार्थ अभिमान प्रत्येक सामान्य माणसाप्रमाणे साहित्यिककलावंतांनाही असतो. राजकीय विचारवंत आणि वैज्ञानिक यांचे राष्ट्रप्रेमही त्यांच्या उक्ती आणि कृतीतून प्रकट होत असते. त्यामुळेच आपल्या मातृभूमीचे सर्वार्थाने रक्षण करणे हे तिच्या पुत्राचे नुसते नैतिकच नव्हे, तर आद्य कर्तव्य असते. भारतीय स्वातंत्र्यचळवळीचा इतिहास याची साक्ष आहे. आपल्या प्रियकर हिंदुस्थानाचा आणि स्वर्गापेक्षा श्रेष्ठ अशा जन्मभूमीचा अभिमान राष्ट्रप्रेमी कवींनी आपल्या अंगाखांद्यावर सदैव बाळगून तो आपल्या तेजस्वी कवनातून व्यक्त केलेला आहे. आपल्या मातृभूमीला परवशतेचा स्पर्शही होऊ नये, आणि झालाच तर तिच्या त्या दास्यातून मुक्तता करण्यासाठी देशातील सर्वसामान्य माणसे आणि क्रांतिकारकांना कानमंत्र देण्याचे महत्कार्य हा साहित्यिक कलावंत करीत असतो. आपल्या कृती-उक्तीतून राष्ट्राची अस्मिता जपण्याचा तेजस्वी मंत्रांचा उद्‌घोष करीत असतो. स्वा. सावरकरांच्या राष्ट्रीय बाण्याच्या कवितेने हे प्रखर तेज:कण उजळवून हिंदभूची अस्मिता जपण्याचे ऐतिहासिक कार्य केले आहे. त्यांचे हे काम भारतीय स्वातंत्र्य-इतिहासात सुवर्णाक्षरांसारखे तळपत आहे.

कवी गोविंदांच्या कवितेने स्वातंत्र्याच्या यज्ञकुंडात जे निखारे आपल्या काव्याच्या समिधांनी फुलविले, त्याचप्रमाणे आणि त्याच सुमारास स्वा. सावरकरांची कविता भारतीयांची मने क्रांतिकार्यासाठी पेटवीत होती. त्यांची अस्मिता जागी करून हिंदभूचा प्राचीन देदीप्यमान इतिहास उभा करीत होती. त्यांना सशस्त्र क्रांतीसाठी सिद्ध होण्याचे पोट-तिडकीने आवाहन करीत होती.

आपल्या प्रिय भारत देशाबद्दल कवी गोविंद,

'क्षमाशूर दानशूर ज्ञानशूर तू ।  
दैत्यार्दन यवनार्दन म्लेंछार्दन तू ।  
शत्रुंजय मृत्युंजय मदनंजय तू ।  
राष्ट्रराज भुवनराज बुद्धिधर तू ।  
.................................,  
तुझी भारता, प्रभुता वाल्मिकीकता  
व्यास संस्तुता। कृष्ण वनिता। राम नंदिता।।'

अशी प्रशस्ती करून त्याच्यापुढे नतमस्तक होतात, तर स्वा. सावरकर,

'सकल जगामधि छान। आमचे प्रियकर हिंदुस्थान।।  
केवळ पंचप्राण। अमुचे सुंदर हिंदुस्थान।।'

असे म्हणून 'भारत' शब्दाऐवजी 'हिंदुस्थान' शब्द योजून हिंदभूची अस्मिता जागी करतात. कुसुमाग्रज या हिंदुस्थानातील मराठी मातीचा महिमा गाताना म्हणतात,

'तिच्या गगनात घुमे। आद्य स्वातंत्र्याची द्वाही  
हिच्या पुत्रांच्या बाहूंत। आहे समतेची ग्वाही'

स्वातंत्र्य आणि समता या चिरंतन मूल्यांसाठी मराठी मातीतील शूरवीरांचे बाहू सदैव सरसावलेले आहेत. या तीनही कवींच्या राष्ट्रीय भावनेचा हा समान धागा मराठी कवितेला ललामभूत आहे.

स्वा. सावरकर यांनी आपले संपूर्ण जीवन राष्ट्र-कार्यासाठीच अर्पण केले होते. सशस्त्र क्रांती करून स्वातंत्र्यप्राप्ती आणि हिंदुराष्ट्राचे रक्षण हे त्यांचे प्रमुख जीवितसाध्य होते. आणि त्याच तळमळीतून, तेजातून त्यांचे कवितेसकट सर्वच साहित्य निर्माण झाले आहे.

'हे मातृभूमी। तुजला मन वाहियेले
वक्तृत्व वाग्विभवही तुज अर्पियेले
तूतेंचि अर्पिली नवी कविता रसाला
लेखाप्रति विषय तूचि अनन्य झाला'

या काव्यपंक्तींतून त्यांचा मातृभूमीबद्दलचा जाज्वल्य अभिमान, सर्वस्व अर्पण करण्याची समर्पणाची भावना आणि राष्ट्रासाठी वैयक्तिक जीवनातील सुखे तुच्छ लेखण्याची युयुत्सुवृत्ती यांचे स्पष्ट दर्शन घडते.

"स्वा. सावरकरांची उपजत कवित्वशक्ती, वक्तृत्व-शक्ती, इतिहासप्रेम, काव्यप्रेम, देवीभक्ती, उत्कट भावना आणि तर्कबुद्धी ह्यांच्यातील रस्सीखेच, चाफेकर, रानडे यांच्या हौतात्म्याने प्रभावित होऊन स्वदेशाच्या दुःस्थितीने तळमळणाऱ्या अंतःकरणाने देवीपुढे धाव घेऊन केलेले ध्यान आणि मी माझ्या देशाचे स्वातंत्र्य परत मिळविण्या-साठी 'सशस्त्र क्रांतीचा केतू ('निशाण' नव्हे) उभारून मारिता मारिता मरेतो झुंजेन' ही केलेली प्रतिज्ञा ह्या-सारख्या आठवणींचा भाग वाचकाला विस्मित करणारा आणि त्यातील असाधारण प्रत्ययामुळे त्याला प्रभावित करणारा आहेच. तथापि सावरकर ज्या भाषेत व शैलीत आणि आवेशपूर्ण थाटात हे निवेदन करतात, त्यामुळे बाळ सावरकरांइतकीच प्रगत अशी पुढे सुपरिचित झालेली स्वातंत्र्यवीर सावरकरांची 'हिंदुराष्ट्रपती', 'मूर्ती दुजाती' वाचकांच्या डोळ्यांसमोर व मनासमोर उभी राहते.'[५८] स्वा. सावरकरांच्या आत्मवृत्ताच्या आधारे डॉ. बा. वा. दातार यांनी त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे सर्वच पैलू या विवेचनातून उलगडून दाखविले आहेत. त्यावरून त्यांच्या व्यक्तित्वावर पडलेला तत्कालीन राजकीय घडामोडींचा प्रभाव आणि त्यातून त्यांनी मातृभूमीच्या स्वातंत्र्यासाठी केलेली कठोर प्रतिज्ञा ही त्यांच्या भावी कर्तृत्वाची नांदीच म्हटली पाहिजे. 'राष्ट्रीय जीवनाचे संरक्षण हीच आपल्या साहित्याची आद्य, मुख्य चिंता असली पाहिजे' ही त्यांची साहित्य-विषयक भूमिका त्यांच्या प्रमुख राष्ट्रीय स्वरूपाच्या कवितेतून जाणीवपूर्वक व्यक्त झाली आहे. स्वातंत्र्यनिष्ठा, राष्ट्रनिष्ठा यांच्या दृष्टीने असलेली हिंदुत्वनिष्ठा, समता आणि त्यातूनच निर्माण झालेली विज्ञाननिष्ठा, बुद्धिनिष्ठा ह्या स्वा. सावरकरांच्या जीवनान्तापर्यंत जीवननिष्ठा होत्या. आणि त्या त्यांनी आपल्या वक्तृत्वातून आणि लेखन-कर्तृत्वातून निष्ठेने पाळल्या. त्यांच्या राष्ट्रीय जाणिवेच्या कवितेतूनही त्यांचे दर्शन घडल्याशिवाय राहत नाही.

स्वा. सावरकरांना त्यांच्या उमेदीच्या काळात ब्रिटिशांच्या जुलमी राजवटीचे दर्शन घडत होते. स्वदेश, स्वसंस्कृती, स्वभाषा यांना गुलामगिरीचे ग्रहण लागले होते. ते लो. टिळकयुगाचेही जवळून आवलोकन करीत होते. लो. टिळकांच्या स्वदेशी चळवळींचा त्यांच्या कृति-उक्तीवर प्रभाव पडत होता. त्यामुळेच लो. टिळकांची जहाल विचारसरणी त्यांना पटत होती. आगरकरांच्या 'अगोदर सामाजिक सुधारणा' याऐवजी 'देशाला स्वातंत्र्य मिळविणे हे आपले आद्य कर्तव्य आहे', या टिळकांच्या मताशी ते सहमत होते. टिळकयुगानंतर ते महात्मा गांधींच्या अहिंसेवर आधारित स्वातंत्र्यचळवळीचे स्वरूपही पाहत होते. परंतु त्यांना म. गांधींचा शांततेचा आणि अहिंसेचा स्वातंत्र्यप्राप्तीचा मार्ग फारसा पसंत नव्हता. 'स्वदेशी चळवळ', 'मिठाचा सत्याग्रह', 'छोडो भारत' यांसारख्या स्वातंत्र्यप्राप्तीच्या चळवळींबद्दल त्यांना निश्चित-पणे जिव्हाळा होता. म्हणून त्यांनी तेथे सक्रिय योगदानही दिले होते. परंतु त्या चळवळी वेळखाऊ असल्याने त्या त्यांना फारशा मान्य नव्हत्या. त्यांना सशस्त्र क्रांती करून स्वातंत्र्य हवे होते.

इंग्रजांनी भारतीय जनतेवर लादलेली अन्याय्य गुलाम-गिरी झुगारून देण्यासाठी स्वातंत्र्यसैनिकांनी भोगलेला तुरुंगवास, फाशीच्या शिक्षा, या कृतीतून दिसणारा भारतीय जनतेचा त्याग आणि स्वातंत्र्याकांक्षा इत्यादींचे दिव्य-दाहक दर्शन सावरकरांच्या कवितेतून घडते. ब्रिटिशांची जुलमी सत्ता उलथून पाडण्याची शपथ त्यांनी लहान वयातच घेतली होती. त्यांना हिंदुस्थानच्या गौरवशाली

इतिहासाबद्दल सार्थ अभिमान होता. त्यांना भारतीय संस्कृती आणि तिचे प्राचीन वैभव ह्याबद्दल नितांत आदर होता. त्यामुळेच राष्ट्रप्रेमाचे तेज त्यांच्या कित्येक आत्मनिष्ठ कवितांतून उजळून निघालेले आहे. त्याचप्रमाणे ब्रिटिश सत्तेबद्दलचा राग आणि तिरस्काराची भावना तेवढ्याच तीव्रतेने व्यक्त झाली आहे.

स्वा. सावरकरांना भारतीय स्वातंत्र्याचा ध्यास लागला होता. स्वातंत्र्य ही त्यांच्या दृष्टीने पवित्र देवता होती. म्हणून त्यांनी 'स्वतंत्रतेचे स्तोत्र' खालील शब्दांत आळविले–

'हे अधम-रक्त-रंजिते। सुजन पूजिते। श्री स्वतंत्रते
तुजसाठी मरण ते जनन
तुजवीण जनन ते मरण
तुज सकल चराचर शरण'

त्यांची ही संपूर्ण कविता म्हणजे स्वातंत्र्यप्राप्तीसाठी एका देशप्रेमी क्रांतिकारकाने दिलेला भारतीय जनतेची मने पेटविणारा संजीवनी मंत्रच आहे. स्वातंत्र्यभावनेचा ज्वलंत असा आविष्कार या कवितेच्या प्रत्येक ओळीतून प्रकट झाला आहे. राष्ट्राबद्दलचे उत्कट प्रेम आणि स्वातंत्र्याची तीव्र लालसा त्यांच्या व्यक्तित्वाचे अंगभूत घटक असून तेच कवितेचे प्राणतत्त्व आहेत. जाज्वल्य देशाभिमान हा त्यांच्या कवितेचा स्थायीभाव असल्याने स्वतंत्रतादेवीच्या पवित्र चरणांकडे त्यांचे डोळे खिळून राहणे क्रमप्राप्तच होते. मानसिक, शारीरिक, राजकीय आणि आर्थिक गुलामगिरी हे पारतंत्र्याचे जीवन म्हणजे साक्षात मृत्यूच असतो. 'स्वतंत्रतेचे स्तोत्र' या कवितेत स्वातंत्र्याच्या कल्पनेचे उदात्तीकरण केलेले आहे. एके काळी या भारतभूमीतून सोन्याचा धूर निघत होता. अशा वैभवसंपन्न आणि उत्तम भूमीला परक्यांची दासी होण्याची वेळ आली. म्हणूनच सावरकर म्हणतात, 'तुजसाठी मरण' पतकरणे म्हणजे नवा मुक्त जन्म घेण्याचे समाधान देणारे आहे. कारण 'अधमा'च्या रक्ताचा तुला स्पर्श झाला. त्याचे क्षालन करणे हे प्रत्येक भारतीयाचे परमोच्च कर्तव्य आहे, हीच भावना परोषरीने व्यक्त झाली आहे.

मातृभूमीच्या उत्कट प्रेमातूनच त्यांची राष्ट्रभक्ती उन्नत झाली आहे. जगातील कोणत्याही श्रीमंत देशाहून आमचा हिंदुस्थान आम्हास प्रिय आहे, हे त्यांनी आपल्या कवितेतून आणि समुद्रात घेतलेल्या उडीसारख्या धाडसी कृतीतून दाखवून दिले आहे. हिंदभूचे भौगोलिक, सांस्कृतिक वैभव, स्वराज्यनिर्मितीसाठी आणि भारतीय स्वातंत्र्यासाठी केलेल्या अपूर्व पराक्रमांची तुलना अन्य कोणत्याही देशाशी होणार नाही, हे त्यांनी पटवून दिले.

'सकल जगामधिं छान! अमुचे प्रियकर हिंदुस्थान
केवळ पंचप्राण! अमुचे सुंदर हिंदुस्थान।।
..............................................
जननि! तुझ्या सन्मान-रक्षणी अर्पु रणी हे प्राण।
शत्रुकंठ भंगोनि घालु तुज दारूण रक्तस्नान।।'

या कवितेतील शब्द जणू रक्ताने लिहिले असून त्यातून व्यक्त होणारी भारतीयांची त्यागभावना स्वातंत्र्यप्रेमातून आली आहे.

ब्रिटिशांची वक्रदृष्टी स्वा. सावरकर आणि त्यांच्या सहकाऱ्यांच्या गुप्त हालचालींवर आणि क्रांतिप्रेरक लिखाणावर पडली होतीच. ब्रिटनमध्ये असणारे त्यांचे जहाल राजकीय विचारांचे लेखन जप्तही केले होते. अशा परिस्थितीत आपणास पुन्हा भारतात परतणे या जन्मीतरी शक्य होणार नाही असे वाटल्यावरून आणि देशबांधवांची तीव्र आठवण झाल्यावर त्यांनी 'सागरास' ही कविता ब्रायटनच्या समुद्रकिनाऱ्यावर लिहिली. 'ने मजसी ने परत मातृभूमीला। सागरा प्राण तळमळला' अशी आर्तता ते येथे व्यक्त करतात. पाश्चात्त्य देशांतील 'प्रासाद इथे भव्य परी मज भारी। आईची झोपडी प्यारी' ही मातृप्रेमाची वत्सलता सावरकरांना तेथे स्वस्थ बसू देत नाही. कवितेतील संपूर्ण आशय आणि अभि-व्यक्तीतील आवेग अत्यंत भावस्पर्शी आहे. 'नभि नक्षत्रे बहुत एक परि प्यारा। मज भरतभूमिचा तारा' अशा शब्दात मातृभूमीचा महिमा सांगतानाच, ही भारतभूमी आज पारतंत्र्यात असली तरी, 'अबला न माझिही माता रे!' हेच सागरास पर्यायाने ब्रिटिश राजवटीस ते ठणकावून सांगतात.

आपल्या हिंदभूसाठीच स्वा. सावरकरांनी आपले समग्र जीवन हेतुपूर्वक समर्पित केले होते. ही महान त्यागाची भावना 'माझे मृत्युपत्र' या कवितेत व्यक्त केली आहे. मातृभूमीसाठी त्यांनी कौटुंबिक सुखाची आहुती स्वातंत्र्याच्या यज्ञकुंडात दिली. यज्ञकुंडातील तळपत्या

अनुक्रमणिका

आगीत ते स्वतः आणि कुटुंबीय होरपळून निघाले. त्या यातना त्यांनी 'सतीचे व्रत' स्वीकारून सहन केल्या.

'की घेतले व्रत न हे आम्ही अंधतेने
लब्ध-प्रकाश इतिहास-निसर्ग-माने
जे दिव्य, दाहक म्हणूनि असावयाचे
बुद्ध्याचि वाण धरिले करि हे सतीचे!'

संसार तर चिमणी पाखरेही करतात. तसा संसार त्यागून राष्ट्राच्या संसारासाठी स्वार्थ जाळून समर्पणाच्या भावनेने कृतार्थ होण्यातील समाधान त्यांना लाखमोलाचे वाटले.

स्वा. सावरकरांचे आत्मसमर्पण त्यांना आत्मबलातून प्राप्त झाले होते. ब्रिटिश त्यांना समुद्रमार्गे नेत असताना त्यांनी फ्रान्समधील 'मार्शोलिस' या बेटावर कस्टडीतून निसटून जाण्याचा अतिशय धाडसी प्रयत्न केला होता. या ऐतिहासिक घटनेला स्वा. सावरकरांच्या जीवनात आणि वाङ्मयात अनन्यसाधारण महत्त्व प्राप्त झालेले आहे. बोटीतून उडी मारून निसटून जाण्याच्या प्रयत्नामुळे ब्रिटिश आपला यापुढे आणखी छळ करतील, परंतु आपण त्या छळास पुरून उरू, असा मनोमन निर्धार त्यांनी 'आत्मबल' या कवितेतून व्यक्त केला.

'अनादि मी, अनंत मी, अवध्य मी भला
मारिल रिपु जगति असा कवण जन्मला' – ही

प्रखर आत्मबलाची आणि बेडरपणाची वृत्ती हिंदभूच्या अस्मितेपोटीच त्यांच्या ठायी निर्माण झाली होती, हे वादातीत सत्य आहे.

श्री छत्रपती शिवाजीमहाराजांनी स्वधर्माचा उच्छाद मांडणाऱ्या यवन, इंग्रज, पोर्तुगीज यांच्याशी संघर्ष करून त्यांना जेरीस आणले. सिंहाच्या आवेशाने त्यांनी या जुलमी राजवटींना शह दिला. पुरेसे सैन्यबळ आणि आधुनिक शस्त्रास्त्रे नसताना श्री छत्रपती शिवाजी-महाराजांनी स्वराज्यनिर्मितीचा संकल्प सिद्धीस नेला. म्हणून स्वा. सावरकर त्यांना 'हिंद नृसिंहच' म्हणतात. या तेजस्वी इतिहासप्रेमातून त्यांना भारतीयांचा अभिमान जागा करावयाचा होता, यात शंकाच नाही.

स्वदेश आणि स्वसंस्कृतीच्या अस्मितेसाठी स्वा. सावरकर जाणीवपूर्वक प्रयत्न करीत होते. ब्रिटिशांनी भारतीय जनतेच्या गळ्यात आपला दिखाऊ माल मारण्याचा सपाटा लावला, तेव्हा सावरकरांनी भारतीयांची अस्मिता जागी करून परदेशी मालावर बहिष्कार घालण्याचे आवाहन केले. भारतीयांनी स्वाभिमानाने पेटून उठण्यासाठी आणि 'स्वदेशी'चाचा स्वीकार करण्यासाठी 'स्वदेशीचा फटका' ही कविता लिहिली.

'नेऊनि कच्चा माल आमुचा देती साचा पक्क रूपे।
आमच्यावरी पोट भरी परि थोरि कशाची तरी खपे।।

चला चला जाऊ या घेऊ या देशि पटापटा।
जाडे भरडे गडे कसेही असो सेवु परि झटाझटा।।'

या काव्यपंक्तींतील 'स्वदेशी'चा बाणा आणि वस्तुस्थिती सावरकरांनी नेटक्या शब्दांत कथन केली आहे. 'दीपावलीचे लक्ष्मीपूजन' या कवितेतील 'स्वदेश लक्ष्मी पुजू साधुनि जरि मंगल वेळ। गजांत लक्ष्मी हिंदुहिंदुच्या दारी डोलेल' या ओळीतूनही भारतीय संस्कृतीचा महिमा आणि स्वदेश-प्रेमच प्रकट झाले आहे. या कविता वाचताना कवी गोविंद यांची 'कान उघडणी' ही उपरोधिक भाषेतील कविता स्मरल्याशिवाय राहत नाही. हीच ती या दोनही कवींची वैचारिक बांधिलकी होय.

भारतीयांना छळणाऱ्या इंग्रज अधिकाऱ्यांविरुद्ध सावरकर आणि त्यांचे सहकारी विविध कटकारस्थाने रचत होते. त्यांना प्रोत्साहन देण्यासाठी त्यांनी 'जा झुंज!' ही कृतिप्रेरक कविता लिहिली.

'या भारतभूमीच्या समरांगणी गेले।
या चिंतेने बहु वीर लढुनिया मेले
कुणी घोर यातनाचिंता चितेवरि जळले।
कुणि फास गळ्यासी लागताहि न ढळले' – या

ओळींतील हौतात्म्य पतकरणाऱ्यांचा त्याग हा तरुणाईला कृतिप्रेरक ठरला होता. 'हा भगतसिंग! हाय हा!' या कवितेतूनही क्रांतिवीरांचे बलिदान, त्यांचे राष्ट्रप्रेम भारतीय जनता व्यर्थ जाऊ देणार नाही, हा अविचल आत्मविश्वास ठासून भरलेला आहे.

ब्रिटिशांचा विविध प्रकारचा छळवादच भारतीय क्रांतिवीरांना शक्ती देईल, यावरही त्यांचा दृढ विश्वास होता. 'पाण्यातील आग ती' या कवितेतील 'बंदीगृहाचे आतुनि भडकवी पाण्यातली आग ती' यासारख्या काव्य-पंक्तीतून हा आत्मविश्वास सावरकर तरुणांत जागवितात. 'पाण्यातील आग' हा विरोधविकासाचा पवित्रा सावरकरांनी

येथे घेतला आहे.

ब्रिटिशांच्या छळाला मर्यादाच नव्हती. भारतीय जनता मात्र गरीब गायीप्रमाणे सगळे सहन करीत होती. परंतु अन्यायाला कुठेतरी सीमा असते या न्यायाने ब्रिटिशांच्या दुष्ट प्रवृत्ती मुळापासून उखडून टाकण्यासाठी सावरकर आणि त्यांचे मित्रमेळे संकल्प करीत होते. क्रूरकर्मा रॅण्डसारखा ब्रिटिशधार्जिणा अधिकारी भारतीयांच्याच कष्टावर जगून त्यांना छळत होता. त्याला सनदशीर मार्गाने जेरबंद करणे शक्यच नव्हते. म्हणून चाफेकर-बंधू आणि त्यांच्या सवंगड्यांनी राणी एलिझाबेथ हिच्या शुभचिंतनाचा समारंभ साजरा होत असतानाच इकडे,

'भक्ष्य रॅण्ड बहु मस्त देखता सिंह धावला बगीकडे।
गोळी सुटली, गडबड मिटली, दुष्ट नराधम चीत पडे।।'

अशा रीतीने चाफेकरांनी मग्रुरीत वावरणाऱ्या रॅण्डवर गोळ्या झाडून भारतीयांच्या मनातील चीड व्यक्त केली. या बेडर वृत्तीमुळे फाशीच्या शिक्षेच्या परिणामाचीही त्याने तमा बाळगली नाही. हीच सावरकरांची सशस्त्र क्रांती होय. चाफेकरांचे हे भारतीय जनतेच्या क्रांतीचे तेज मूळ कविता वाचल्यावर अधिक प्रत्ययास येते.

स्वा. सावरकरांची धर्मनिष्ठा पुरोगामी विचाराला आणि विज्ञाननिष्ठेला पोषक होती. भारतीय स्वातंत्र्यप्राप्ती सशस्त्र क्रांतीशिवाय झाली तर सावरकरांना हवीच होती. परंतु अहिंसा, सत्याग्रह यांसारख्या चळवळींतून स्वातंत्र्य लवकर हाती येत नसल्याने ते सशस्त्र क्रांतीच हवी या मतावर आले. अंदमान येथील स्थानबद्धतेच्या काळातही हाच क्रांतिकारक विचार त्यांच्या मनात घोळत होता. गरजेनुसार शस्त्र उगारणे अपरिहार्य नव्हे तर अटळ आहे, त्यात काही पाप घडेल; असे त्यांना वाटत नव्हते. शस्त्राची गरज आणि पुरुषार्थ या दोनही बाबी त्यांना महत्त्वाच्या वाटत होत्या. 'शस्त्रगीत' या कवितेतील,

'व्हावया स्वदेश सर्व सिद्ध आत्मशासना
नव्या पिढीस द्या त्वरे समग्र युद्धशिक्षणा'

या ओळींतून स्वा. सावरकरांनी सशस्त्र क्रांतीसाठी आवश्यक युद्धशिक्षणाची महतीच सांगितली आहे. स्वा. सावरकरांच्या काही प्रातिनिधिक कवितांच्या वरील उल्लेखावरून असे ध्यानात येते की, सावरकरांची राष्ट्रीय जाणिवेची कविता ही राष्ट्रप्रेमाने न्हाऊन निघालेली आहे. या कवितेला हिंदभूच्या प्राचीन संस्कृतीचे ऐतिहासिक पराक्रमांचे कोंदण आहे. स्वातंत्र्यप्राप्तीच्या तेजाचा प्रकाश पाहण्यासाठीच ही कविता अवतरली आहे. आपले तनमन त्यासाठी त्यांनी त्यात झोकून दिले आहे.

स्वा. सावरकरांच्या समग्र कवितांचा आविष्कार स्फुट कवितांप्रमाणेच दीर्घ कवितांच्या रूपातही घडला आहे. 'कमला', 'विरहोच्छ्वास', 'महासागर', 'गोमंतक' इत्यादी काव्यांमधून महाकवीची प्रतिभा प्रत्ययास येते. या सर्वच कवितांत हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याबरोबरच अन्य विषयांनाही स्थान आहे. हिंदुस्थानचे एकसंधत्व अबाधित रहावे, जातिपातींचे ग्रहण सुटावे आणि सर्व जगात एक आदर्श राष्ट्र म्हणून हिंदुस्थान दिसावे, हीच त्यांची मनोमन इच्छा होती. स्वतंत्र बुद्धीच्या या कवीच्या कवितेला मानवताधर्म आणि हिंदुत्वनिष्ठेची जबरदस्त अस्मिता होती. समाजाच्या रोटी-बेटीसारख्या सरमिसळीतून समाजातील अस्पृश्यता नष्ट झाली पाहिजे, सर्वांना मंदिर-प्रवेश खुला असला पाहिजे, ही त्यांची डोळस हिंदुत्वनिष्ठा होती. समाजातील अस्पृश्यता पाळणे म्हणजे राष्ट्रीय सुतकच आहे, अशी त्यांची धारणा होती. म्हणून त्यांनी रत्नागिरी येथील विठ्ठल मंदिरात सर्वांना प्रवेश खुला केला होता. ही त्यांची कृतिशीलता ध्यानात घेण्यासारखी आहे.

'हे सुतक युगांचे सुटले।
विधिलिखित विटाळी फुटले
जन्माचे भांडण मिटले। शत्रुंचे जाळे तुटले
आम्ही शतकांचे दास, आज सहकारी
आभार जाहले भारी'

या 'सुतक युगाचे फिटले' कवितेतील काव्यपंक्ती त्यांच्या अंतःकरणातील विशाल मानवतेचे दर्शन घडविणाऱ्या आणि राष्ट्रीय एकसंधता अबाधित ठेवण्याच्या मनोवृत्तीच्या द्योतक आहेत.

'जयोस्तुते ते श्रीमहन्मंगले शिवास्पदे शुभदे', 'यशो-युतां', 'वंदे' यासारख्या संस्कृतप्रचूर शब्दांतून त्यांचे संस्कृतिप्रेमच अधोरेखित होते. 'गालावरच्या कुसुमी किंवा कुसुमांच्या गाली' ही शब्दांची अदलाबदल अर्थबहुलता प्रकट करणारी आहे. 'इतिहास' शब्दातील 'अतिहास'








अनुक्रमणिका

लिहिण्याच्या पद्धतीत त्यांचा भाषाशुद्धीचाच विचार ध्यानी येतो. कवितेचा आशय कधी नाटकातील पदांच्या चालीच्या धर्तीवर, तर कधी मुक्तछंदसदृश 'वैनायक' वृत्तातून अभिव्यक्त झाला आहे. त्यांची कविता पदांच्या धर्तीवर गेय आहे. त्यांची काही कविता भावगीतात्मक असली, तरी ही कविता वीररसाचाच परिपोष करते. ध्रुपदाच्या योजनेमुळे आशयाचा प्रभाव वाढून अंतर्गत लयवाढीमुळे ती अधिक भाववाही होते. काही कवितेला शाहिरी कवितेतील ओजस्वीपणाचा बाज प्राप्त झाला आहे. आपल्या कवितेचा आशय ते कधी उपरोध, उपहास यांच्या आधारे व्यक्त करून वाचकांच्या मनाची पकड घेतात. अशा रीतीने स्वा. सावरकरांची राष्ट्रीय जाणिवेची कविता आत्मनिष्ठ पातळीवरची असली, तरी राष्ट्रप्रेमाची प्रबळ भावना, बेडर वृत्ती आणि जबरदस्त आत्मविश्वास प्रकट करणारी आहे. या दृष्टीने कवी गोविंदांची कविता आणि स्वा. सावरकरांची राष्ट्रीय कविता सहोदर आहे, एवढे साम्य त्या दोघांच्या राष्ट्रीय जाणिवेच्या कवितेत निश्चितपणे आहे, हे वादातीत सत्य आहे.

**कुसुमाग्रजांची नैतिक अधिष्ठानाची बहुआयामी कविता :**

कविवर्य कुसुमाग्रजांची कविता साम्यवादातून समाजमनाला जागविणारी आणि स्वातंत्र्यप्राप्तीच्या आकांक्षेतून निर्माण झालेली क्रांतिप्रेरकही आहे. केशवसुतसंप्रदायातील आधुनिक कवींच्या बहारदार कवितेचा कालखंड १९२० च्या आसपास संपुष्टात आला होता. कविवर्य भा. रा. तांबे यांचे सौंदर्यपूजक काव्यलेखन सुरू होते. रविकिरण मंडळातील नव्या उमेदीच्या कविता सर्वसामान्यांच्या भावभावना लक्षणीय स्वरूपात व्यक्त करीत होत्या. अशा पार्श्वभूमीवर कुसुमाग्रजांनी समाजमनातील आर्थिक विषमता, त्यातून निर्माण झालेला संघर्ष, भांडवलशाहीचा अतिरेक आणि साम्यवादाचा उदय इत्यादी घटकांना प्राधान्य देणारी कविता लिहून मराठी समाजमनावर आपला ठसा उमटवला. 'कुसुमाग्रज हे मानवतेचे कवी आहेत. आजच्या सामाजिक असंतोषाचा ज्वालामुखी त्यांच्या कवितेतून इतर काव्यांप्रमाणे नुसता धुमसत नाही, तो अग्निरसाचा वर्षाव करीत सुटतो.' [६] वि. स. खांडेकर यांनी कुसुमाग्रजांच्या कवितेसंबंधी काढलेले हे उद्‌गार त्यांच्या सामाजिक आणि राष्ट्रीय जाणिवेच्या कवितेचे यथार्थ स्वरूप स्पष्ट करणारे आहेत. नाशिकच्या गोदेच्या पाण्यात काहीतरी विशेष सामर्थ्य असल्याचे नमूद करून सावरकर आणि कवी कुसुमाग्रजांच्या नाशिकशी असणाऱ्या संबंधाचा गौरवपूर्ण उल्लेखही त्यांनी येथेच केला आहे.

१९३० नंतरच्या काळात आर्थिक विषमता, जागतिक मंदी यांसारख्या कारणांनी आपल्या सामाजिक जीवनात वादळे उठू लागली होती. ब्रिटिशांच्या आगमनाचा परिणाम आपल्या सांस्कृतिक-आर्थिक क्षेत्रांतही जाणवू लागला होता. फ्रेंच राज्यक्रांतीने समाजात रूढ केलेल्या स्वातंत्र्य, समता आणि बंधुभाव या जीवनमूल्यांचा समाजावर प्रभाव पडत होता. त्याचा प्रभाव युरोपीय वाङ्मयाप्रमाणेच आधुनिक मराठी कवितेवरही पडला. फ्रेंच राज्यक्रांतीने जी नवी मूल्ये पाश्चात्त्य समाजात प्रस्थापित केली, त्यांचा परिणाम भारतीय जनमानसावर पडत होता. व्यक्तिनिष्ठा आणि समाजातील स्वातंत्र्यविचार यांना खतपाणी मिळत होते. यंत्रसंस्कृतीने भौतिक समृद्धी युरोपात वाढीस लागली. त्यातून भांडवलशाहीचा उदय झाला. आणि परिणामी मालक-मजूर संघर्ष, गरीब-श्रीमंत अशी दरी वाढीस लागली. उच्च भांडवलदारवर्ग धनाच्या राशीत लोळू लागला आणि कष्टकरी मात्र पिळवणूक, अन्याय आणि दारिद्र्यात पिचू लागला. अशा परिस्थितीत युरोपात साम्राज्यवादाने थैमान घातले. त्याचा अपरिहार्य परिणाम दुसऱ्या महायुद्धाच्या भडक्यात झाला. आणि त्यातूनच नव्या समानतेच्या सामाजिक क्रांतीची चाहूल लागली. रशियातही २० व्या शतकात समाजवादी क्रांती घडून आली. आणि या नव्या समाजक्रांतीचे अपत्य म्हणजेच 'समाजवाद' होय. समाजातील समतेसाठीच ही सामाजिक क्रांती घडत होती. महात्मा गांधींचे स्वतंत्रता आंदोलन, १९३० च्या चळवळीतील तुरुंगवास भोगणाऱ्यांचे जहाल विचार, आद्य क्रांतिकारकांचे बलिदान या सर्व घटनांचा आघात भारतीय जनमानसावर होत होता. जनरल डायरचा अत्याचार, चीन-जपान युद्धातील नरसंहार आणि यासारख्या राष्ट्रीय-आंतरराष्ट्रीय घटनांचे विविध स्त्रोत कुसुमाग्रजांच्या कवितेला येऊन मिळाले होते. भारतीय स्वातंत्र्याची जाणीव कवी गोविंद, सावरकरांच्या काळाच्या

मानाने कुसुमाग्रजांच्या काळात काहीशी फिकी पडली असली, तरी तिची धग कायम होती. ही सर्व पार्श्वभूमी कुसुमाग्रजांच्या सामाजिक-राजकीय कवितांच्या केंद्रस्थानी आहे, असे व्यापक अर्थाने म्हणता येते. त्यामुळेच त्यांच्या कवितेत स्वातंत्र्य, समता आणि बंधुभाव या जीवनमूल्यांचे चिरंतन दर्शन घडते. भांडवलशाहीला विरोध आणि समाजवादी-मार्क्सवादी विचारसरणी त्यांना मनोमन पटलेली आहे. म्हणूनच सामाजिक-राजकीय क्रांतीचे स्वागत त्यांच्या कवितांत अत्यंत आवेशाने झालेले आहे. त्यातूनच त्यांचा 'स्थंडिल संप्रदाय' प्रकट झालेला दिसतो.

सन १९३० च्या आगेमागे अनंत काणेकरांनी 'धनी जनांशी झुंज खेळूनी' ग्लानी आलेल्या समतावाद्यांना जागे करण्यासाठी, चवताळून त्याविरुद्ध लढण्यासाठी आणि समतेची सत्ता स्थापनेसाठी त्यांना प्रेरणा देणारी कविता लिहिली. पुढे श्रीकृष्ण पोवळे यांच्या 'अग्निपराग' या कवितासंग्रहातूनही क्रांतीचा निखारा फुललेला आढळला. वा. रा. कांत यांच्या 'रुद्रवीणा' या संग्रहात कुसुमाग्रजांच्या स्थंडिल संप्रदायाचे नाते जोडणारी कविता आहे. कवी अनिलांनीही याच दरम्यान 'मानवता' या कवितेत 'अन्याय घडो कोठेही- चिडून उठू आम्ही' असा मानवतेचा भाव व्यक्त करून 'निर्वासित चिनी मुलास' या दीर्घ काव्यातून आंतरराष्ट्रीय पातळीवरचा दहशतवाद अधोरेखित केला आहे. १९४२ च्या 'छोडो भारत' आंदोलनाने उग्र स्वरूप धारण केलेले असतानाच साम्यवादाच्या जाणिवेने भारतीय तरुणांची मने पेटून उठत होती. याच काळात कुसुमाग्रजांसारखे तरुण प्रतिभावंत कवी यज्ञ, समिधा, क्रांती, बलिदान, अग्नी, प्रकाश, संग्राम, रक्त, आहुती यांसारख्या 'प्रतिमा' घेऊन काव्यलेखन करीत होते. या 'अग्निपूजक', 'प्रकाशपूजक' कवींच्या संप्रदायालाच 'स्थंडिल संप्रदाय' संबोधले गेले. त्यात कुसुमाग्रज हे अग्रभागी होते. कुसुमाग्रजांच्या 'विशाखा' संग्रहातील 'आगगाडी व जमीन', 'अहिनकुल', 'क्रांतीचा जयजयकार' या कविता त्यांच्या सामाजिक-राजकीय जाणिवा व्यक्त करणाऱ्या प्रातिनिधिक पण अंगावर रोमांच आणणाऱ्या कविता आहेत. दलित उपेक्षित वर्गावर होणारे जुलूम, हुकूमशाही, देश-परदेशांतील साम्राज्यशाही इत्यादींनी केलेल्या रक्तशोषणाची प्रतिक्रिया कुसुमाग्रजांच्या कवितेत प्रभावीपणे चित्रित झालेली आहे. कुसुमाग्रजांच्या राष्ट्रीय जाणिवेच्या कवितेवर स्वा. सावरकरांच्या कवितेचा प्रभावही काहीसा जाणवतो. सावरकरांची इंग्रजांविरुद्ध क्रांतीची आणि आत्मसमर्पणाची भावना व्यक्त करणारी कविता आणि कुसुमाग्रजांची इंग्रजी सत्तेविरुद्ध तरुण क्रांतिकारकांच्या मनाचा उत्साह वाढविणारी 'क्रांतीचा जयजयकार' सारखी तेजस्वी कविता यांत विलक्षण साम्य जाणवते. स्वा. सावरकर ब्रिटिशांविरुद्धच्या [illegible] 'पाण्यातील आग भडकल्याचे' संबोधतात. तर कुसुमाग्रज 'अहिनकुल' या कवितेत सत्ताधीश भांडवलशाही आणि सामान्य जनतेच्या तीव्र संघर्षाला 'रण काय भयानक - लोळे आग जळात' अशा अतिशयोक्त कृतीतील संघर्ष आणि विरोधाभासातील नाट्य सारख्याच शब्दप्रतिमांनी व्यक्त करतात. म्हणून 'कुसुमाग्रजांच्या कवितेवर सावरकरांच्या कवितेचाही संस्कार घडलेला आहे. दोघांनी अंगीकारलेली दिव्यदाहकाची पूजा व दास्यमुक्तीसाठी स्वीकारलेली आत्मसमर्पणाची वृत्ती या साम्यातून दिसून येते. 'अनादी मी, अनंत मी, अवध्य मी भला। मारिल रिपु जगति असा कवण जन्मला' असे म्हणत बलवानाला आव्हान देणारी बळींची मृत्युंजयी जिद्द दोघातही आढळते. सावरकरांच्या कवितेतील यज्ञकल्पनाही कुसुमाग्रजांच्या मनावर खोल संस्कार करून गेलेली आहे. सावरकरांच्या 'आकांक्षा', 'आत्मबल' व कुसुमाग्रजांच्या 'अहिनकुल', 'मी जिंकलो' या कवितांतील विषय, वृत्ती आणि मांडणीतील साधर्म्य लक्षणीय आहे. कुसुमाग्रजांच्या कल्पनेचा थाट जरी स्वतंत्र असला, तरी सावरकरांच्या आणि त्यांच्या कल्पनाविलासाची जातकुळी एकच आहे. .... क्रांतिकारकांची युयुत्सू वृत्ती, मृत्युंजयी जिद्द, कल्पनाशक्ती अशा बाबतीत कुसुमाग्रजांची सावरकरांशी जवळीक दिसते.'[७] हे प्रा. शंकर वैद्य यांचे म्हणणे सर्वार्थाने खरे आहे. सावरकरांच्या कवितेतील स्वातंत्र्याकांक्षा त्यांच्याही कवितेत आहे. 'क्रांतीचा जयजयकार' ही कविताही सावरकरांच्या क्रांतिप्रेरक कवितेला पूरक शक्ती देणारीच आहे. भारत देशाचा 'आमरण आशरण' ध्वज त्यांना खुणावतो. मात्र एवढा एकच ध्यास त्यांच्या कवितेला नाही. त्यामुळेच सामाजिक विषमतेविरुद्ध तीव्र संघर्षाची भूमिका मांडणारा मानवतावादी कवी आणि वास्तवाचे

अनुक्रमणिका

भान ठेवून काळाबरोबर आपली कविता फुलविणारा बहुआयामी कवी म्हणून कुसुमाग्रजांकडे पाहिले जाते. आणि ते त्यांच्या कवितेचे एक सामर्थ्य आहे.

समाजजीवनातील विषमतेमुळे आर्थिक, सामाजिक आणि राजकीय संघर्षामुळे मध्यमवर्गीय माणसाचे जीवन गोंधळून गेले आहे. सत्तास्पर्धा, अहंकारी वृत्ती या सैतानी वृत्तींनी थैमान घातले आहे. त्यामुळे सामान्य माणूस निराशेच्या, वैफल्याच्या गर्तेत सापडून गलितगात्र झाला आहे. अशा वेळी कुसुमाग्रज,

'किरणांचा उघडून पिसारा देवदूत कोणी
काळोखावर खोदित बसला तेजाची लेणी'

असे म्हणून सामान्यांच्या जीवनात 'आशेची वात' लावतात. ही त्यांची वृत्तीही प्रकाशपूजकच आहे.

समाजातील पिळवणूक आणि अन्याय पाहून कुसुमाग्रजांची प्रतिभा पेटून उठते. त्या दृष्टीने 'हिमलाट', 'बळी', 'लिलाव', 'सहानुभूमी', 'माडाचे मनोगत', 'पाचोळा' यांसारख्या कवितांतील त्यांनी उभे केलेले चित्र मनाला हेलावून सोडणारे आहे. 'लिलाव' कवितेतील,

'उर तिचे ते उघडे न्याहाळोनी।
थोर थैलीतील वाजवीत नाणी
आणि ही रे! पुसतसे सावकार।
उडे हास्याचा विखार'

या कवितेतून भांडवलशाहीचा उच्छाद आणि गरीब स्त्रीच्या शीलाचाही असा लिलाव मांडला जातो. 'सहानुभूती'-मधील गरीब-श्रीमंतीचे दर्शन, 'बळी कवितेतील मजुराचा अन्नपाण्यावाचून होणारा अंत हाही भांडवलशाहीच्या विषमतेचा बळी आहे.

'भेकडांनो या इथे साधण्याला पर्वणी
पेटवा इथे मशाली अन् झडू द्या चौघडे'

उपाशी पोटी मेलेल्या या मजुराचे हे मढे म्हणजे मानवाच्या संस्कृतीचा ध्वजच आहे, असे उपरोधिकपणे ते म्हणतात. निदान या 'बळी'तून तरी सामाजिक क्रांतीची मशाल पेटली पाहिजे, असे आवाहनही वरील काव्यपंक्तींतून ते करतात.

'अहिनकुल' आणि 'आगगाडी व जमीन' या कवितांतील सामाजिक चित्रण अत्यंत वास्तव आणि प्रातिनिधिक स्वरूपाचे आहे. 'अहिनकुल' मधील 'नाग' आणि 'आगगाडी व जमीन'मधील 'आगगाडी' ही दोनही प्रतीके पिळवणूक करणाऱ्या भांडवलदार आणि जुलमी सत्ताधीशांची आहेत. 'जमीन' हे सहनशील प्रजेचे तर 'नकुल' सामान्य जनतेतील सत्ताधाऱ्यांना विरोध करून त्यांच्या रक्ताचा घोट घेणाऱ्या क्रांतिकारकांचे प्रतीक शोभावे इतके चपखल आहे. शोषक आणि शोषित यांच्यात धुमसणारा संघर्ष कुसुमाग्रजांनी रूपकात्मक पातळीवर वास्तवाला कल्पनेची जोड देऊन साकारला आहे.

'नको नको ग। आक्रंदे जमीन।
जाळीत जाऊ तू। बेहोष होऊन'

या काव्यपंक्तींतून सत्ताधीशांची मस्ती आणि सामान्यांची सहनशीलतेची परिसीमा साध्याच पण परिणामकारक शब्दांत ते व्यक्त करतात. परंतु सामान्यांचा संयम संपताच, 'जग गुलाम सारे या सम्राटापुढती' अशा उन्मत्त सत्ताधीशावर 'आरक्त ओठ ते ध्वजा जणू रक्ताच्या' अशी क्रांतीची मशाल घेऊन मिरवणारा 'नकुल' उडीच घेतो. लाल रंग हा तर क्रांतीचाच रंग आहे.

'पडलीच उडी! की तडितेचा आघात
उल्केपरि तळपत कण्यात घुसले दात,
विळख्यावर विळखे कसून चढवी सर्प
फुंफार करी अन् पिशापरी त्वेषात'

हा प्रत्यक्ष संघर्ष कुसुमाग्रजांनी चित्रदर्शी शैलीतून नजरेसमोर उभा केला आहे. अखेरीस कोणत्याही अन्यायाचा शेवट असाच होतो. 'संग्राम' सरताच सत्ताधीशाचे रक्तमांस गिळण्यास कीटक जमा होतात. पण 'आनंदे न्हाती त्यात तृणाची पाती' हा सामान्य माणसाचा विजय कुसुमाग्रजांनी साम्यवादाची पताका उभारून व्यक्त केला आहे. येथे कुसुमाग्रज 'जमीन' किंवा 'नकुल' या सामान्य माणसाच्या उक्ती-कृतीतूनच आपल्या भावना मांडतात. जुलमी 'आगगाडी'ची हजारो शकले आणि इंग्रजांसारख्या सत्ताधीश नागाचे 'गर्वोन्नत उराचे' शतखंडित तुकडे होणे, यातच कवीला अभिप्रेत असलेली साम्राज्यवादाची धूळधाण आणि समाजवादाची प्रस्थापना अभिव्यक्त होते. या संदर्भात डॉ. स. रा. गाडगीळ लिहितात, "भांडवलशाहीने-साम्राज्यशाहीने निर्माण केलेल्या समाजरचनेत गुलाम राष्ट्रांच्या राजकीय स्वातंत्र्याचा प्रश्न सामाजिक आणि आर्थिक क्रांतीपासून अलग करताच येत नाही. सामाजिक आणि

आर्थिक क्रांती न होता राजकीय स्वातंत्र्य प्राप्त झाले, तर ते बहुजन समाजाच्या दृष्टीने अर्थशून्य असते. हा सिद्धांत समाजवादी विचारांतूनच प्रस्थापित झाला. आणि यामुळे या काळातील क्रांतिवाद्यांनी राजकीय क्रांतीबरोबरच सामाजिक आणि आर्थिक क्रांतीलाही आवाहन केले."[८] कुसुमाग्रजांच्या वरील कवितांखेरीज, लिलाव, पाचोळा, बळी, गुलाम, बंदी आणि 'कोलंबसचे गर्वगीत' इत्यादी कवितांतील समाजातील दैन्य, विषमता, साम्राज्यवादाचे थैमान आणि भांडवलशाहीचे दुष्परिणाम यांचे विदारक चित्र पाहिल्यावर वरील विवेचन सर्वार्थाने रास्तच आहे. साम्राज्यशाही आणि भांडवलशाही मुळापासून उखडून टाकल्याशिवाय समाजवाद प्रस्थापित होऊच शकणार नाही, ही कुसुमाग्रजांची मनोमन धारणा आहे. त्यामुळेच त्यांच्या कवितेतील 'नकुल' हा त्यांच्या सर्वच कवितांतील शोषित जनतेच्या समतेसाठी साम्राज्यशाहीवर तुटून पडणाऱ्याचे प्रतीक आहे, असे डॉ. सुधीर रसाळांनी म्हटले आहे, ते खरेच आहे. तसेच 'कोलंबसाचे गर्वगीत' मधील ध्येयावर असीम निष्ठा असणारा कोलंबस उन्मत्त आणि उफाळलेल्या सागराच्या साम्राज्यवादी वृत्तीवर तुटून पडतो. आणि त्या सागराला नामोहरम करून यशाचा किनारा गाठतो. ही कवितादेखील साम्राज्यवाद आणि साम्यवाद यांचेच प्रतीक आहे, असे काही समीक्षकांना वाटते.

कुसुमाग्रजांचा साम्यवाद असा कवितेत अवतरत असला, तरी त्यांची प्रतिभा स्वातंत्र्ययुद्धाच्या घडामोडी न्याहाळीत होती. त्यातूनच त्यांनी 'क्रांतीचा जयजयकार', 'जा जरा पूर्वेकडे', 'जालियनवाला बाग', 'आव्हान', 'टिळकांच्या पुतळ्याजवळ' यांसारख्या कविता १९३४ ते १९४१ या वर्षांत लिहिल्या. या कवितांतही कुसुमाग्रजांनी समूहमनाचाच आविष्कार साधला आहे. त्यामुळेच या कवितांत एकाच वेळी वस्तुनिष्ठता आणि काव्यात्मकता यांचा सुंदर मेळ साधला आहे.

'क्रांतीचा जयजयकार' ही कुसुमाग्रजांची राष्ट्रीय जाणीव व्यक्त करणारी सुप्रसिद्ध कविता आहे. या कवितेच्या आरंभी कुसुमाग्रजांची मूळ टीप "अन्नत्याग करून मृत्यूच्या दारात पाऊल टाकताना बंगाली राजबंद्यांच्या ओठांवर असलेच गाणे स्फुरले नसेल काय?" (ज्योत्स्ना मासिक, दिवाळी अंक - १९३९) अशी दिली आहे. नंतरच्या आवृत्तीत 'बंगाली' शब्द परिष्करणाने त्यांनी गाळला. त्यातून ही कविता विशिष्ट प्रदेशातील राजबंद्यापुरती मर्यादित न ठेवता सर्व क्रांतिकारकांच्या आवाजाचे द्योतक बनली. "या कवितेतील क्रांतिकारक दहशतवादाकडून समाजवादाकडे वळले आहेत. लाहोर कट, काकोरी कट, चितगाव कट या निरनिराळ्या दहशतवादी कटांतील हे राजबंदी अंदमानातून नुकतेच स्वदेशात आले होते व आपल्या मागण्या मान्य करून घेण्यासाठी त्यांनी बंगालच्या तुरुंगामध्ये अन्नसत्याग्रह सुरू केला होता. अशा प्रसंगी कुसुमाग्रजांसारख्या क्रांतिवादी कवीच्या प्रतिभेला स्फुरण येणे अगदी साहजिक होते."[९] हे डॉ. स. रा. गाडगीळ यांचे विवेचन कवितेच्या मूळ गाभ्याकडे घेऊन जाणारे आहे. साम्राज्यवादाला त्यांनी दिलेला हा धक्काच आहे. 'क्रांतीचा जयजयकार' या कवितेने अशा रीतीने देशकालाच्या मर्यादा ओलांडल्या आहेत. त्यामुळेच ही कविता सार्वकालीन होऊन 'अक्षर'च झाली आहे. उन्मत्त, जुलमी, क्रूर अशा इंग्रजी सत्तेने भारतीय जनतेचा जो छळवाद चालविला होता, त्या छळवादाला क्रांतिकारकांनी दिलेले हे आव्हान आहे. बेड्यांतील काठिण्यापेक्षाही क्रांतिकारकांची बेडर छाती आणि मातृभूमीच्या मुक्ततेची इच्छा प्रबळ आहे. या कवितेतील अनुभव राजबंद्यांचाच नव्हे तर तत्कालीन देशनिष्ठ अशा स्वातंत्र्याची आकांक्षा असणाऱ्या सर्व समाजाचा आहे. कारण ब्रिटिश जसे जमेल तसे स्वातंत्र्याचे आंदोलन चिरडून टाकीत होते. भारतीय स्वातंत्र्य दूरदूर जात होते. म्हणून कवितेतील राजबंदी आवेशाने म्हणतात,

'कशास आई भिजविशी डोळे, उजळ तुझे भाल
रात्रीच्या गर्भात असे उद्याचा उषःकाल
सरणावरती आज आमुची पेटताच प्रेते
उठतील त्या ज्वालातून भावी क्रांतीचे नेते
लोहदण्ड तव पायामधले खळाखळा तुटणार
आई खळाखळा तुटणार
गर्जा जयजयकार क्रांतिचा गर्जा जयजयकार'

हा आवेग क्रांतिकारकांच्या अनिवार अशा राष्ट्रप्रेमातून स्फुरलेला आहे. कवितेतील एकेका काव्यातून राजबंदी आपलं मनोबल वाढवून समाजालाही बरोबर घेतात.

त्यांनीही सावरकरांप्रमाणे 'अंधतेने व्रत' स्वीकारलेले नाही. म्हणूनच त्यांच्या ओठी 'एकच तारा समोर आणि पायातळी अंगार', 'मृत्युंजय आम्ही! आम्हाला कसला कारागार?' असे ध्येयाच्या आसक्तीतून मृत्यूला सामोरे जाणारे क्रांतिप्रेरक शब्द येतात. या कवितेतील भावना म्हणजे क्रांतिकारकांचे स्वगत असून मृत्यूही त्यांनी जणू आपल्यासमोर उभा केला आहे. महात्मा गांधींच्या 'छोडो भारत' या मंत्राचा जागर आणि 'इन्किलाब जिंदाबाद' यासारख्या क्रांतिकारकांच्या घोषणा या कवितेच्या पाठीमागे आहेत. या कवितेच्या संदर्भात डॉ. द. भि. कुलकर्णी लिहितात, "या कवितेत राजबंद्यांचा अनुभव व्यक्त झाला आहे. निव्वळ राजबंद्यांचाच नव्हे, तत्कालीन समाजाचाच .... मराठीतील ही एक अनन्यसाधारण कविता आहे. वीर, करुण, उदात्त अशा अनेक रसांच्या लाटा आपल्या मनात उठवीत ही कविता पुढे पुढे सरकते. कवितेचे तोंड पहिल्या कडव्यात इंग्रजी सर्पाकडे आहे, तर दुसऱ्या कडव्यात ते स्वतः राजबंद्यांकडे वळते."[१०] डॉ. कुलकर्णी या कवितेचे सूत्र उलगडून दाखवीत असून १९४२ च्या राष्ट्रीय आंदोलनाचे प्रतिध्वनी या कवितेत समूहमनातून उमटतात, हेच खरे.

'जालियनवाला बाग' ही कविता ब्रिटिशांची जुलमी दहशतवादी वृत्ती दर्शविणारी आणि निरपराध माणसांच्या बळीचे विदारक सत्य सांगणारी कविता आहे. ही कविता संबोधनात्मक असून सत्ताधीशांची भूक कोठपर्यंत जाऊ शकते, याचे विदारक स्वरूप येथे कवीने सांगितले आहे. जालियनवाला बागेतील हत्याकांडाच्या स्मृतीने साम्राज्यवाद्यांना सैतानाची उपमा दिली आहे. ख्रिस्ती धर्मातील 'प्रेम आणि शांती अन् क्षमा यामध्ये वसतो परमेश!' या वचनाचे अमानवी विडंबन करणाऱ्या या पाशवी वृत्तीच्या साम्राज्यवाद्यांच्या कृतीवर अतिशय विदारक प्रकाश टाकून त्यांचे खरे स्वार्थी रूप उघडे केले आहे. 'जा जरा पूर्वेकडे' या कवितेतील चीन-जपान युद्धाचे पडसाद म्हणजे सबलांनी दुर्बलांवर केलेल्या राक्षसी अत्याचारांची आणि मानवी संस्कृतीला लाजविणारी पाशवी कृत्येच आहेत.

'खड्ग लावुनी उराला बायकांना वेढती,
आणि दारी ओढती
भोगती बाजारऱ्हाटी मांस आणि कातडे,
जा जरा पूर्वेकडे'

आतापर्यंत साम्राज्यवादी राजकीय-आर्थिक पिळवणूक करीत होते. पण शस्त्रबलाने त्यांनी नैतिक पातळी कशी ओलांडली, याचे विदारक सत्य कुसुमाग्रजांनी सांगितले आहे. विज्ञानाने माणूस सुखी होईल अशी वैज्ञानिकांची धारणा होती. परंतु त्याऐवजी 'धूळ आणि अग्नि यांच्या दौलती चोहीकडे' हीच कृत्ये साम्राज्यवाद्यांनी आरंभली आहेत. या सर्व पार्श्वभूमीतून कुसुमाग्रजांची राष्ट्रवादी भूमिका संकुचित नाही. त्यासाठी 'नकुल' सारख्या दुर्बलांनी आपली तीक्ष्ण नखे बाहेर काढण्याची हीच वेळ आहे, हेच कुसुमाग्रजांना सुचवावयाचे आहे. जपान्यांच्या क्रूर वर्तनातून प्रेतांचा खच पडला आहेच. आणि 'व्यर्थ तेथे शोषिताचे वाहुनी जाती सडे' अशा धारोष्ण रक्ताच्या नद्या परमेश्वराच्या कृपेनेच वाहत आहेत. हा उपरोधपूर्ण आशय कवीने राजकीय पूर्वभूमीला धरूनच केलेला आहे.

पारतंत्र्याच्या गुहेत मोकळा श्वासही न घेऊ देणाऱ्या ब्रिटिशांच्या विरुद्ध उभे ठाकून स्वाभिमानाने गोळ्या झेलणारे 'चार कोळसेवाले' ही कविताही राष्ट्रतेजाचे प्रतीक आहे. समाजवादाविरुद्ध साम्राज्यवाद असा हा आंतरराष्ट्रीय पातळीवरील भयानक संघर्ष काव्यात्म पातळीवर मांडताना त्याची नैतिकता कवीने अबाधित ठेवली आहे. म्हणून त्यांची कविता विशिष्ट परिस्थितीत अवतरली असली, तरी कालातीत आहे.

'आवाहन', 'क्रोध' आणि 'रक्त तुझे हे' या राष्ट्रीय जाणिवेच्या कवितांमधून १९६२ साली चीनने 'हिंदी-चिनी भाई भाई' चा नारा देत विश्वासघाताने भारतावर जे आक्रमण केले, त्याचे आवाहनात्मक आणि कृतिप्रवण चित्रण रेखाटले आहे. त्यातूनही भारतीय जनतेची अस्मिता जागी करून शौर्याचेही ओजस्वी आणि हृदयद्रावक चित्रण केले आहे.

'बर्फाचे तर पेटुनी उठले सदन शिवाचे कोसळते
रक्त आपुल्या प्रिय आईचे शुभ्र हिमावर ओघळते'

असे म्हणताच भव्य हिमालयाचे रक्तलांछित रूप भारतीय जनमानसाला अस्वस्थ करते. मातृभूमीचा असा घात होत असताना 'अशा घडीला कोण करंटा तटस्थतेने दूर

अनुक्रमणिका

खळे' असे कृतिप्रेरक आवाहन ते करतात. भारतीयांची वृत्ती जात्याच 'रणफंदी'ची असल्याने ते कधीही भयभीत होत नाहीत, ही लढाऊ वृत्ती ते जागी करतात. येथेही सावरकरांच्या राष्ट्रप्रेमाची आठवण आल्याशिवाय राहत नाही.

'अग्निरसाचे कलश घेऊनि नद्या निघाल्या रणाकडे
गतकालाने कधि न पाहिला आज असा इतिहास घडे'

असा भारतीयांचा 'क्रोध' जागा झाला आहे. नद्यांनी भारतीय संस्कृती पवित्र-मंगल बनविली. पण त्याच नद्या राष्ट्रीय तेजाने अग्निबाणाचे तुषार घेऊन रणांगणाकडे धावू लागल्या आहेत. कुसुमाग्रजांच्या कल्पनांची झेप आणि रूपकात्मकता कवितेला अशी आशयघन करते. 'रक्त तुझे हे' या कवितेतील रणवीरांचे रक्त जमिनीत जिरण्यासाठी नाही; तर 'वज्रमुठीने' शत्रूवर तुटून पडण्यासाठीच आहे. ते समेटासाठी नाहीच, हा निर्धारही ते व्यक्त करतात. कारण त्या भारतवीराला कोटीजनांच्या आशीर्वादाचे बळ आहे. ही हिमालयाच्या तोडीची शक्ती या जवानांना लाभली आहे. कुसुमाग्रजांची राष्ट्रीय कविता अशी समूहमनाला सदैव जागी ठेवत आली आहे.

कुसुमाग्रजांनी सैनिकावर बऱ्याच कविता लिहिल्या आहेत. त्यातून सैनिकाचा आवेश आणि आत्मबलिदानच प्रकट झाले आहे. 'खाकी' मधील सैनिक कौटुंबिक नाती गावी ठेवून जीवनव्यवहाराचा हिशोब न करता सीमेवर लढताना वीरमरणाला सामोरा जातो. त्याचे जीवन म्हणजे,

'संसाराच्या सीमेवरती। बर्फाच्या मरणाळ तटावर
तिथे पहा ती गर्द लाल रक्ताची धारा।
वाहत आहे'

या जवानाचे जीवन संवेदना, विवेक यांपासून कोसो दूर, लांब आहे. त्याचे सैनिकी जीवन म्हणजे 'बर्फाचे मरणाळ तट.' 'मरणाळ तट' या प्रतिमेतून 'मरणाचीच मालिका' हा अर्थ ध्वनित होतो. अशा वीरमरण पतकरणाऱ्या कित्येक वीराचे शवही हाती लागत नाही. कधी त्याचे स्मारकही उभारले जात नाही. म्हणून कवी कृतज्ञभावनेने लिहून जातो,

'काळोखातून विजयाचा ये पहाटचा वारा
प्रणाम माझा पहिला तुजला मृत्युंजय वीरा!'

कवितेतील हा कृतज्ञभावही राष्ट्ररक्षण करणाऱ्यांना प्रेरक आणि आधार देणारा वाटतो.

'टिळकांच्या पुतळयाजवळ' ही कवितादेखील टिळकांच्या अलौकिक व्यक्तित्वाची आणि कर्तृत्वाची यशोगाथा गाणारी कविता आहे. कवीच्या निराशाग्रस्त मनाला या पुतळ्याचे दर्शन घडताच एका भव्यदिव्य जीवनव्रतीचा साक्षात्कार पडतो. लो. टिळकांचाही आयुष्यभराचा संघर्ष विवेकाच्या पातळीवर ब्रिटिशांना नामोहरम करण्यासाठीच होता. त्यांच्या पुतळ्यावर अजून पाश्चात्त्य विचारांचे आघात होतात. परंतु,

'ती अजिंक्य छाती ताठर अन् रणशील
जी पाहुनि सागर थबके परते आत'

'असंतोषाचे जनक' असणाऱ्या आणि 'स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क असून तो मी मिळविणारच', असे आत्मविश्वासाने सांगणाऱ्या टिळकांची 'अजिंक्य छाती' ब्रिटिशांपुढे अखेरपर्यंत स्वाभिमानाने ताठच राहिली.

लो. टिळकांच्या ताठर अन् रणशील छातीचे चित्र पुढे करणारा कवी भारतीय स्वातंत्र्याचा 'किनारा' पाहण्याचे स्वप्न पाहतो.

'जयांनी दले येथ हाकलली।
क्षणासाठी या जीवने जाळली
सुखेनैव स्वीकारून शूल-करा।
आला किनारा'

अशी स्वातंत्र्याची चाहूल लागल्यावर सामान्य जनतेला होणारा आनंद आणि अभिमान सर्वच भारतीयांच्या चेहऱ्यावर आणि जीवनावर वर्षाव करीत आला. 'तुझ्या रक्षण-सेवेत। होवो कृतार्थ जीवन' ही समर्पणाची आणि त्यागाची भावनाही ते व्यक्त करतात. राष्ट्रीय तिरंगा ध्वज तर भारतीयांची अस्मिता आहे. ती अस्मिता आणि स्वातंत्र्य आचंद्रसूर्य नांदावेत अशी प्रार्थनाही ते आपल्या ध्वजगीतात करतात.

राजकीय विचारवंत आणि क्रांतिकारकांच्या अथक परिश्रमांतच भारतीय स्वातंत्र्याचे निशाण फडकवले गेले. स्वातंत्र्यानंतर आम्ही काय कमवले आणि काय गमावले, याचे चिंतन आणि उपहासात्मक बोल कुसुमाग्रजांनी 'स्वातंत्र्यदेवीची विनवणी' या फटक्यातून खुद्द स्वातंत्र्य-

देवीच्या मुखानेच वदविले आहेत.

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर सर्वसामान्य माणूस निर्भय होऊन सुखी व्हावा, ही रास्त अपेक्षा होती. ब्रिटिशांच्या जोखडातून सुटून आमचे शासन आम्हीच लोकशाही पद्धतीने चालवू, असा निर्धारही व्यक्त झाला. सामाजिक आणि आर्थिक स्तरावर समानता आणि मानवता या नैतिक मूल्यांची नव्याने प्रस्थापना होईल. सर्वच क्षेत्रांतील माणसे तन-मनाने झटून देशाच्या सर्वांगीण प्रगतीसाठी झटतील इत्यादी अपेक्षा सर्वसामान्य माणूस बाळगून होता. पण ब्रिटिशांची गुलामगिरी सोडली तर भारतीयांनी अद्याप फारसे काही मिळविले नाही, आहे ही खंत कुसुमाग्रजांनी मार्मिक भाषेत व्यक्त केली आहे. राजकीय स्तरावर प्रचंड भ्रष्टाचार आहे, नैतिकतेचा अभाव आहे. सामाजिक जीवनात हुंडाबळी, बलात्कार आणि लाचलुचपत इत्यादी दुर्गुणांनी थैमान घातले आहे. तरुणांच्या व्यक्तित्वातील कर्तृत्वाचे तेज ओसरत असून हुंडा घेऊन ते विकले जात आहेत, अशा लाजिरवाण्या घटना घडत आहेत. आदर, पावित्र्य आणि कृतज्ञता ही मूल्ये पायदळी तुडविली जात आहेत. म्हणून स्वातंत्र्यदेवीच्या मुखातून कवी म्हणतो,

'सूर्यकुलांचा दिव्य वारसा प्रिय पुत्रांनो तुम्हा मिळे।
काळोखाचे करून पूजन घुबडाचे व्रत धरू नका।।

...............................................

वेतन खाऊन काम टाळणे हा देशाचा द्रोह असे
करतील दुसरे बघतील तिसरे असे सांगुनि सुटू नका।।

...............................................

समान मानव माना स्त्रीला तिची अस्मिता खुडू नका।
दासी म्हणुनी पिटू नका वा देवी म्हणुनी भजू नका।।

...............................................

लाख लाख जन माझ्यासाठी जळले मेले विसरू नका।
मीच विनविते हात जोडूनि वाट वाकडी धरू नका।।'

या फटक्यातील वरील काव्यपंक्तींतून कुसुमाग्रजांची सामाजिक समतेची त्यांच्या कवितेतील मानवतेची भावना आणि क्रांतिकारकांच्या त्यागाचे स्मरण नेमक्या शब्दांत व्यक्त झाले आहे. कुसुमाग्रजांच्या समाजवादाच्या स्थापनेचा आणि साम्राज्यवादाच्या उच्चाटनाचा अर्थ आणि त्यांच्या सर्वच राष्ट्रीय जाणिवेचा गाभा नैतिकतेच्या पातळीवर व्यक्त झाला आहे. 'क्रांतीचा जयजयकार' या कवितेची दुसरी राष्ट्रकल्याणाची व्यापक भावना येथे प्रकटलेली आहे. एकंदरीतच कुसुमाग्रजांची कविता राष्ट्रीय तेजाची आरती गाताना सामाजिक समतेचा आग्रह कायमच करीत आली आहे. 'जीवनविनाशक अशिवशक्तीचा उदय, त्यामुळे जीवनाच्या अस्तित्वालाच निर्माण होणारा धोका, या जीवनातून उगवलेली जीवनदायी, जीवनरक्षक शिव-शक्ती, अशिव शक्ती यांच्यातील संघर्ष आणि अंतिमतः शिवशक्तीचा विजय हा नैतिक जाणिवांचा मूलबंध कुसुमा-ग्रजांना अतिशय प्रिय आहे."[११] हा डॉ. सुधीर रसाळ यांचा कुसुमाग्रजांच्या सामाजिक समता, राष्ट्रीय स्वातंत्र्या-साठी व्यक्त झालेल्या कवितांतील शिवशक्तीचा उत्कर्ष आणि भांडवलशाही-साम्राज्यशाही या अशिवशक्तीचा विध्वंस यासंबंधीचा नेमका निष्कर्ष अर्थपूर्ण शब्दांत व्यक्त झाला आहे. त्यांनी हा मूलबंध कुसुमाग्रजांच्या 'अहिनकुल' या कवितेच्या आधारे विस्तृत स्वरूपात उलगडूनही दाखविला आहे.

कुसुमाग्रजांच्या राष्ट्रीय कवितेचे मूल्यमापन करताना बा. भ. बोरकर लिहितात, 'त्यांच्यापर्यंत चालत आलेल्या मराठी कवितेच्या दोन धारा त्यांच्या प्रतिभेने अधिक संपन्न आणि रसमय तर केल्याच; शिवाय त्यांची परिमाणेही कितीतरी पटींनी वाढविली. त्यांतली एक धारा राष्ट्रीय कवितेची, जी विनायक, गोविंद आणि सावरकर यांनी प्रवर्तित केली. आणि दुसरी धारा सामाजिक जाणिवेच्या कवितेची, जी केशवसुत, गोविंदाग्रज आणि माधव जूलियन यांनी जागी केली. कुसुमाग्रजांनी या दोन्ही धारांत नवा प्राण ओतला आणि त्यांना रसाची आगळी प्रतिष्ठा मिळवून दिली."[१२] कुसुमाग्रजांच्या सामाजिक आणि राष्ट्रीय जाणिवेच्या कवितेने आधुनिक मराठी कवितेचा सगळा वारसा कसा आत्मसात केला, हे कुसुमाग्रजांचे समकालीन कवींनी केलेली मार्मिक भाष्य त्यांच्या कवितेची सर्व वैशिष्ट्ये सांगून जाते.

कुसुमाग्रजांची प्रतिभा प्रकाशपूजक असल्याने सूर्याचे तेज, यज्ञातील निखारे, ज्योतीतील तेजःकण, उल्कापात,

तडितेचा अग्निलोळ, लखलखत्या तारका अशा तेजस्वी प्रतिमांचे त्यांना आकर्षण आहे. त्यांच्या कवितेतील 'रात्रीच्या गर्भात असे उद्याचा उषःकाल', 'अनंत अमुची ध्येयासक्ती अनंत आशा' अशा काव्यपंक्तींना सुभाषितांचे रूप देऊन ते मानवाला सतत कार्यप्रवण करतात. कुसुमाग्रजांची सामाजिक आणि राष्ट्रीय आशय असणारी कविता त्यामुळे तात्कालिक न राहता सार्वकालीन झाली आहे. ही कविता कवी गोविंद, स्वा. सावरकर यांच्याच जातकुळीची असून, ती ध्येयाची, तेजाची आणि त्यागाची आहे. त्यामुळे या तीनही कवींच्या कवितांचा अनुबंध एकाच बळकट धाग्यात विणलेल्या तेजस्वी आणि स्फूर्तिदायक अशा रत्नांप्रमाणे लखलखता प्रकाश देणारा आहे. ही राष्ट्रीय जाणिवेची कविता कालच्या पिढीला क्रांतीचा संजीवनी मंत्र देणारी होती, तर आजच्या पिढीला देशातील भयग्रस्त स्थितीबद्दल अंतर्मुख करावयास लावणारी असून उद्याच्या पिढीला आपल्या देशाच्या सामाजिक-राष्ट्रीय क्रांतीच्या इतिहासाचे पोवाडे गावयास लावणारी आहे, असे म्हटले तर वावगे ठरू नये.

**संदर्भ :**

१. विनायकांची कविता : संपादक भवानीशंकर पंडित, चित्रशाळा प्रकाशन, पुणे. पाचवी आवृत्ती, पृ. १४९.
२. कुसुमाग्रज – 'जीवनलहरी', दुसरी आवृत्ती, पुणे पृ. २ (प्रस्तावना)
३. निवडक कविता कवी गोविंदांची : निवड वि. वा. शिरवाडकर, अक्षरमुद्रा प्रकाशन, नाशिक.
४. निवडक कविता कवी गोविंदांची, उ. नि. प्रस्तावना, पृ. २५.
५. दोन तात्या : डॉ. बा. वा. दातार, अक्षरमुद्रा प्रकाशन, नाशिक. पहिली आवृत्ती २००२, पृ. ५०.
६. विशाखा : कुसुमाग्रज (प्रस्तावना), कॉन्टिनेन्टल प्रकाशन, १९४२ (पुनर्मुद्रण) १९८५, पृ. १०.
७. रसयात्रा : कुसुमाग्रज, संपादक – बोरकर-वैद्य, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, १९६९, (प्रस्तावना) पृ. ३.
८. डॉ. स. रा. गाडगीळ - मराठी काव्याचे मानदंड, खंड दुसरा, पद्मगंधा प्रकाशन, पुणे २००५, पृ. ९०.
९. डॉ. स. रा. गाडगीळ – उ. नि. पृ. ९०-९१.
१०. नवभारत - मे २०११, कुसुमाग्रज, डॉ. द. भि. कुलकर्णी - पृ. ९.
११. डॉ. सुधीर रसाळ : काही मराठी कवी : जाणिवा आणि शैली, प्रतिमा प्रकाशन, पुणे. दुसरी आवृत्ती १९९६, पृ. ६२.
१२. मराठी वाङ्मयाचा इतिहास : खंड ६, भाग दुसरा. महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे १९९९. पृ. ११७.

☆☆☆

# एकोणिसाव्या शतकातील मराठी कादंबरीविषयक अभिरुची

प्रा. डॉ. रोहिणी तुकदेव

एकोणिसाव्या शतकातील मराठी वाचकांची कादंबरीविषयक अभिरुची समजून घेणे हा या लेखाचा उद्देश आहे. अभिरुचीच्या इतिहासाची प्रस्तुतता डॉ. श्री. व्यं. केतकरांनी मार्मिक शब्दांत सांगितली आहे. ते लिहितात, '.... लोकांच्या आवडीनिवडी काही अंशी प्रत्यक्ष ग्रंथांच्या वाचनाने उत्पन्न झालेल्या असतात, तर काही अंशी पूर्व ग्रंथावर व्यक्त झालेल्या मतांमुळेच उत्पन्न झालेल्या असतात. त्या व्यक्त झालेल्या मतांचा परिणाम उत्तरकालीन अभिरुचीवर घडतो. हे लक्षात घेऊन टीका वाङ्मय लोकाभिरुचीचे निर्णायक कितपत झाले हे आपणास पाहिले पाहिजे. अभिरुचीचा इतिहास आपण लिहू लागलो तर काव्यपरीक्षणाचा इतिहास हा लोकाभिरुचीच्या इतिहासाचा भाग होईल व अभिरुचीचा इतिहास हा वाङ्मयेतिहासाचा भाग होईल. वाङ्मयाचा इतिहास अभिरुचीच्या इतिहासावाचून समजावयाचा नाही.'[१] या लेखातील अभिरुचीविषयक मांडणी, मराठी कादंबरीची स्थिति-गती समजून घेण्यास उपयुक्त ठरेल, अशी आशा आहे.

एकोणिसाव्या शतकात 'कादंबरी' हा नवा साहित्यप्रकार मराठी साहित्यपरंपरेत समाविष्ट झाला आणि अल्पावधीतच वाचकप्रिय झाला. अभ्यासक्रमाचा भाग म्हणून मिसेस फेरार यांनी लिहिलेली 'यात्रेकऱ्याचा वृत्तांत' (सन १८३८) ही पहिली कादंबरी मानली, तर केवळ २७-२८ वर्षांच्या कालावधीत कादंबरी या साहित्यप्रकाराबद्दलची आवड किती वाढली होती, हे १८६५-६६ च्या शिक्षणखात्याच्या अहवालानुसार विविध ठिकाणच्या ३३४ बुक डेपोत ठेवण्यासाठी विकत घेतलेल्या पुस्तकांच्या प्रतींसंबंधीच्या खालील माहितीवरून सहज स्पष्ट होईल. (१) सटीक भारत चम्पु - १०८ (२) पिंगलादर्श - २८० (३) अरबी भाषेतील सुरस व चमत्कारिक गोष्टी, भाग ५ वा - १३५ (४) हिंदुस्थानचा भूगोल - ५० (५) गायन शतक भाग ३ - ६३ (६) वृत्त रत्नाकर - २८ (७) नामार्थ बोध - १५० (८) पद्य रत्नावली - १५० (९) जातीभेद विवेकसार - १५० (१०) सुलोचना आणि माधव - ४७५ (११) मुक्तामाला - २१३.[२] बुक डेपोंमध्ये कादंबऱ्यांच्या प्रती सर्वाधिक घेतल्या होत्या, ही वस्तुस्थिती बोलकी आहे. तत्कालीन मूठभर सुशिक्षित वर्ग हाच कादंबरीचा वाचकवर्ग होता. त्या लोकांनी घेतलेले कादंबरीवाङ्मयाचे आढावे, मासिक-पुस्तकांतून केलेली परीक्षणे, दिलेले अभिप्राय, कादंबऱ्यांना लिहिलेल्या प्रस्तावना, जाहिराती यांद्वारे त्या काळातील कादंबरीविषयक अभिरुची समजून घेता येते.

कादंबऱ्या प्रकाशित होऊ लागल्यावर त्यांच्याबद्दलचे अभिप्रायही स्वाभाविकपणे व्यक्त होऊ लागले. मात्र, कादंबऱ्यांबद्दलचे निवेदन, समालोचन आणि भाष्य प्रकट होण्यासाठी निमित्त म्हणून एक भौतिक घटना घडली. सन १८६३ मध्ये ग्रेट ब्रिटन आणि आयर्लंडच्या रॉयल एशियाटिक सोसायटीच्या संचालकांनी व उपाध्यक्षांनी भारताच्या माजी सचिवांना असे सुचविले की, प्राचीन संस्कृत ग्रंथांचे संपादन, संस्कृत वा इंग्रजी ग्रंथांचे देशी भाषांमध्ये अनुवाद आणि राजकीय, धार्मिक, शास्त्रीय आशय असलेल्या स्वतंत्र ग्रंथांचे लेखन करून भारतीयांनी गेल्या काही वर्षात आपले वाङ्मयीन कर्तृत्व सिद्ध केले आहे. तथापि, त्यांतली फारच थोडी पुस्तके युरोपिअन स्कॉलर्सना उपलब्ध होतात. त्यांना त्यांची माहिती व्हावी म्हणून आतापर्यंत प्रकाशित झालेल्या भारतीय पुस्तकांची माहिती देणारी पुस्तिका यादी (Catalogue) प्रकाशित करावी आणि दर तीन महिन्यांनी त्याला नव्या पुस्तकांची नोंद असलेली पुरवणी जोडण्यात यावी. या सूचनेप्रमाणे कार्यवाही होऊ लागली. सर अलेक्झांडर ग्रँट हे पब्लिक इन्स्ट्रक्शनचे डायरेक्टर म्हणून काम पाहू लागले आणि १८६४ अखेरपर्यंत प्रकाशित झालेल्या संस्कृत, मराठी, गुजराथी, कानडी, सिंधी, हिंदी आणि पर्शियन भाषेतील ग्रंथांची यादी प्रसिद्ध करण्यात आली. पैकी, मराठी ग्रंथांची

यादी तयार करून त्यावर अभिप्राय लिहिण्याचे काम म. गो. रानडे यांनी केले. हा अभिप्राय उपलब्ध आहे.

न्या. मू. म. गो. रानडे यांनी सरकारी कामकाजाचा भाग म्हणून केलेल्या कॅटलॉगमध्ये ६६१ पुस्तकांची नोंद आहे. या पुस्तकांची गद्य आणि पद्य अशी वर्गवारी करून त्यातील गद्याचे १. शालेय, २. ललितसाहित्य, ३. शास्त्रीय साहित्य, ४. कायदे असे उपविभाग कल्पिले आहेत. ललित साहित्याचे (Prose Popular Literature) इतिहास, कथात्मक साहित्य (Tales and Fictions), उपदेशपर (नैतिक) निबंध, चरित्र, प्रवासवर्णन, परिपत्रके, दैनिके व नियतकालिके आणि संकीर्ण असे पोटप्रकार ते कल्पितात.

कथात्मक साहित्याबद्दल अधिक माहिती देताना, त्यांची ३९ ही संख्या स्पष्ट करून, ते अधिक विवरण करतात. '३९ पैकी १६ पुस्तके पंचोपाख्यान, वेताळपंचविशी यांसारख्या जुन्या लोकप्रिय कथांची पुनर्मुद्रणे आहेत. १५ पुस्तके इंग्रजी भाषा-संस्कृतीच्या प्रभावातून निर्माण झाली आहेत. २० अनुवाद आहेत तर ५ पुस्तके इंग्रजी कथात्मक साहित्याच्या धर्तीवर लिहिली आहेत. त्यांपैकी कृष्णशास्त्रींनी अरेबियन नाईट्सच्या कथांचा केलेला अनुवाद उत्कृष्ट साधला आहे. स्वतंत्रपणे लिहिलेल्या कथात्मक साहित्यात 'मुक्तामाला' आणि 'राजा मदन' उत्कृष्ट आहेत.' असा अभिप्राय रानडे व्यक्त करतात आणि अशा प्रकारच्या साहित्यकृतींच्या निर्मितीतील भरघोस (भरपूर) वाढ ही या काळातील एक विशेष उल्लेखनीय प्रवृत्ती आहे, अशा शब्दांत प्रारंभापासूनच मराठी वाचकांचा व लेखकांचा ओढा कादंबऱ्यांकडे होता, हे स्पष्ट करतात.

मुंबई विद्यापीठाच्या अभ्यासक्रमांत मराठी आणि अन्य देशी भाषांचा पुन्हा अंतर्भाव व्हावा म्हणून न्या. मू. म. गो. रानडे सातत्याने प्रयत्नशील होते. सन १८९७ साली त्यांनी ५० पेक्षा अधिक नामवंत पंडितांच्या व विचारवंतांच्या सह्या असलेले टिपण विद्यापीठाच्या कुलगुरूंना सादर केले; पण त्याचा फारसा उपयोग झाला नाही. १८९८साली विद्यापीठाच्या अभ्यासक्रमात नेमण्याइतक्या देशी भाषा पुरेशा प्रगल्भ व विकसित आहेत, हे स्पष्ट करण्यासाठी A Note on the Growth of Marathi Literature हा लेख त्यांनी लिहिला. या लेखामुळे सुशिक्षितांत चर्चा सुरू झाली. त्याला प्रतिसाद म्हणून, किंवा त्यापासून प्रेरणा घेऊन काही लेखक-विचारवंतांनी आपली वाङ्मय-विषयक निरीक्षणे मांडली व भाष्य केले.

The Growth of Marathi Literature च्या पहिल्या भागात १८१८ ते ६४ या कालखंडातील मुद्रित ग्रंथनिर्मितीचा आढावा घेऊन प्रतिक्रिया व्यक्त करताना न्या. मू. म. गो. रानडे लिहितात, '... कथात्मक साहित्याचा विचार करता, प्राचीन कथाभांडारात अरेबियन नाईट्सची भर पडली असे दिसते. या प्रारंभीच्या कालखंडात आधुनिक कथात्मक साहित्याच्या निर्मितीला अगदी छोट्या प्रमाणात सुरुवात झाली.' या अल्प प्रमाणातील निर्मितीची कारणमीमांसा करताना ते म्हणतात की, इथल्या समाजाची सांस्कृतिक गरज पुराणांतील आणि इतिहासातील गोष्टींच्या भांडारामुळे पुरेपूर भागवली जात होती. त्यामुळे आधुनिक कल्पित कथात्मक साहित्याला जागाच उरत नव्हती. (पृ. १८)

चौथ्या भागामध्ये नाटक, कादंबरी आणि निबंध या साहित्यप्रकारांबद्दल विचार मांडले आहेत. 'कादंबरी'बद्दल लिहिताना, कल्पित कथांचा हा प्रकार आमच्या प्राचीन वाङ्मयाला अनभिज्ञ नव्हता, असे विधान न्या. रानडे वेताळपंचविशी, विक्रमबत्तिशी, शुकबहात्तरी इ.चा हवाला देऊन करतात आणि सुरुवातीला अशाच प्रकारच्या गोष्टींची भर पडल्याची नोंद करतात.

पहिल्या पन्नास वर्षांत कथात्मक साहित्याची निर्मिती अल्प प्रमाणात झाली; पण त्यानंतरच्या तीस वर्षांत त्यात मोठ्या संख्येने भर पडली. तीनशेपेक्षा अधिक कादंबऱ्या प्रकाशित झाल्या. पैकी १८२ कादंबऱ्यांची दप्तरी नोंदही सापडते.

कथात्मक साहित्याच्या प्रांतात अनुवादावर अधिक भर दिसतो. संस्कृत, उर्दू आणि पर्शियन साहित्याचे नमुने तर इथल्या लेखकांपुढे होतेच; पण सर वॉल्टर स्कॉट, बुलर लिटन, रेनॉल्ड्स, जॉन्सन, स्विफ्ट, डिफो या इंग्रजी लेखकांचा तसेच बोकॅशिओ, ड्युमास यांच्यासारख्या इटालियन व फ्रेंच लेखकांचे लेखनही प्रेरणास्रोत बनलेले दिसते, असे निरीक्षण न्या. रानडे नोंदवितात.

कल्पित कथांचे ते दोन विभाग करतात. १. स्थळ-








काळ आणि परिस्थितिनिरपेक्ष असे, प्रेमाच्या चित्रणाधारे सर्वसाधारण मानवी प्रवृत्तीला प्रभावित करणारे शुद्ध कथात्मक साहित्य आणि २. आधुनिक जीवनशैलीचे तिच्या गुंतागुंतीसह आणि वैविध्यांसह चित्रण करणारे, काळ आणि परिस्थितीच्या बंदिस्त चौकटीत साकारणारे ऐतिहासिक कथात्मक वाङ्मय. पहिल्या प्रकारच्या कादंबऱ्यांची उदाहरणे म्हणून ते 'प्रेमबंधन', 'विचित्रपुरी', 'मंजुघोषा', 'मुक्तामाला', मोचनगड, वेषधारी पंजाबी, अनाथ पांडुरंग, नारायणराव आणि गोदावरी यांचा निर्देश करतात तर दुसऱ्या प्रकारची उदाहरणे म्हणून ह. ना. आपट्यांच्या 'पण लक्षात कोण घेतो', 'आजकालच्या गोष्टी' या शीर्षकाखाली येणाऱ्या कादंबऱ्यांचा व ना. वि. बापटांच्या बाजीराव पेशवा आणि पानिपतची मोहीम या कादंबऱ्यांचा निर्देश करतात. लेखिकांमध्ये ते काशीबाई कानिटकर, गोदावरी पंडित व मिस भोर यांचा उल्लेख करतात.

प्रस्तुत लेखन, मराठी साहित्यातील भाष्य वस्तुनिष्ठ स्वरूपाचे व्हावे, त्यातील अभिप्राय व्यक्तिसापेक्ष आहे, अशा शंकेला जागा राहू नये म्हणून न्या. रानडे यांनी विशेष दक्षता घेतली. इंग्रजी अभ्यासक्रमात लावलेल्या पुस्तकांच्या गुणवत्तेचा दर्जा असलेल्या निवडक, उत्कृष्ट २०० पुस्तकांची यादी पाठविण्याविषयी त्यांनी सुप्रसिद्ध लेखकांना व समीक्षकांना विनंती केली. त्यात काही पदवीधर होते, तर काही पदवी न प्राप्त झालेले होते. एकंदर दहा लोकांनी अशा याद्या पाठविल्या. त्या लोकांची नावे अशी –

**पदवीधर –** १. के. एम. मराठे, २. जी. व्ही. कानिटकर, ३. सी. जी. भानू, ४. विजापूरकर, ५. जी. जे आगाशे.
**पदवी न प्राप्त केलेले –** १. व्ही. के. ओक, २. राजरामशास्त्री भागवत, ३. वासुदेवशास्त्री खरे, ४. ए. के. खेर, ५. एच. के. दामले.

या लोकांनी पाठविलेल्या याद्या आणि कृष्णाजी परशराम गाडगीळ यांनी लबॉकच्या Pleasures of Life वर आधारित लिहिलेल्या पुस्तकातील यादी काळजीपूर्वक पाहून, त्यांनी काही निष्कर्ष नोंदविले. त्यानुसार पाच किंवा पाचपेक्षा अधिक लोकांनी पसंती सांगितलेल्या पुस्तकांच्या यादीतील कादंबऱ्या खालीलप्रमाणे नमूद केल्या आहेत –

१. मी, २. आजकालच्या गोष्टी, ३. पण लक्षात कोण घेतो, ४. अनाथ पांडुरंग, ५. प्रेमबंधन, ६. ठगाची जबानी, ७. बाजीराव पेशवा, ८. पानिपतची मोहीम, ९. मुक्तामाला, १०. मोचनगड. या यादीत 'यमुनापर्यटन'चा उल्लेख नाही, तसेच अन्यत्रही कोठे यमुनापर्यटनचा कादंबरी म्हणून उल्लेख नाही. प्रसारवाङ्मय म्हणून त्याचा एके ठिकाणी उल्लेख आहे.[३]

'विविधज्ञानविस्तार'च्या पुस्तक २९, अंक ७ मध्ये सन १८२८ पासून १८५६ पर्यंत छापून प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांची नावानिशी यादी दिली आहे. त्यात बाळबोध गोष्टी (मिसेस फारार, १८३८), जागती ज्योत (रामचंद्र अमृत दुगल, १८३८), स्त्री चरित्र (रामजी गणोजी, १८५४), यात्रिकक्रमण (हरि केशवजी, १८४१) यांचा समोवश आहे. पुढे कृष्णशास्त्री चिपळूणकरांनी १८६५ ते ६७ अखेरपर्यंत केलेल्या यादीत २२७ ग्रंथांची नोंद केली असल्याचा निर्देश आहे व १८७८-१८९७ अखेरपर्यंत प्रकाशित झालेल्या ग्रंथांची कोष्टकरूपात विषयवार माहिती आहे. 'रिपोर्टर ऑन दि नेटिव प्रेस' यांच्या वार्षिक रिपोर्टातून हे कोष्टक घेतल्याचा उल्लेख आहे. हे कोष्टक खालीलप्रमाणे आहे.[४]

[illegible] (सन १८८३ पासून सन १८९७ अखेर)

| वर्षे | ग्रंथ: [illegible] | ग्रंथ: [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १८८३ पासून १८९७ अखेर वर्षे १५ | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] |
| [illegible] | | | | | | १ | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | १ | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | २९३ |

उपरिनिर्दिष्ट कोष्टकानुसार १८८३ ते १८९७ या काळात एकूण २९३ कादंबऱ्या प्रकाशित झाल्या. पैकी १९४ स्वतंत्र; तर ९९ भाषांतरित होत्या. अल्पावधीतच कादंबऱ्यांची संख्या किती वाढली, हे यावरून स्पष्ट होते. 'कादंबरी' या मराठीत नव्यानेच प्रविष्ट झालेल्या साहित्यप्रकाराला असा वाढता प्रतिसाद मिळू लागला होता.

न्या. रानडे यांच्या उपक्रमात श्री. मोती बुलासा सक्रिय सहभागी झाले. त्यांनी सुरू केलेल्या आणि चालविलेल्या 'सुविचारसमागम' या मासिक पुस्तकाच्या अगदी पहिल्या अंकापासून (मे १८९८) 'मराठी भाषेची






सद्यःस्थिती' ही लेखमाला त्यांनी प्रसिद्ध केली.

या लेखमालेतील ३ ऱ्या लेखात मोती बुलासा तत्कालीन कादंबऱ्यांच्या संदर्भात आपली निरीक्षणे नोंदवतात व भाष्यही करतात. ॲरिस्टॉटलप्रणीत संभवनीयता आणि सुसंगती या निकषांचा ते वापर करतात. आणि म्हणूनच आपल्या लहानपणी लोकप्रिय असलेल्या 'विश्वासराव', 'मंजुघोषा', 'मुक्तामाला', 'रत्नप्रभा' व त्यांच्या धर्तीवरील कादंबऱ्या लोकप्रिय असल्या तरी त्या श्रेष्ठ नव्हेत, असे ते बजावतात. या कादंबऱ्यांतील गोष्टींचा आपल्यासारख्या माणसांना कधीच अनुभव येण्याचा संभव नाही. त्यांतील नायक, नायिका व अन्य लोक यांच्या वागण्याची तऱ्हा पाहिली म्हणजे ते लोक अश्रुतपूर्व अशा काली अरबी भाषेतील गोष्टीतल्या मनुष्यांच्या जवळच्या प्रांतात कोठेतरी राहत असावेत, असे मनाला वाटते; पण त्यांची बुद्धिमत्ता, त्यांचे कलाकौशल्य, त्यांचे विमानारोहण व काचेची हंड्याझुंबरे, मून इत्यादिकांची त्यांच्या बंगल्यात रेलचेल पाहून हे प्राणी एकोणिसाव्या शतकातलेच असावेत, असेही पण एकदा मनाला वाटते. (पृ. क्र. ५४) असा अभिप्राय ते देतात. अशा उणिवा असूनही या कादंबऱ्यांना महत्त्व प्राप्त झाले. याचे कारण सांगताना ते मार्मिकपणे 'एरंडोऽपिद्रुमायते' झाडे नसलेल्या प्रदेशात एरंडालासुद्धा महावृक्षाचे महत्त्व प्राप्त होते, असे म्हणतात. तत्कालीन कादंबरीवाङ्मय खुरटे आणि खुजे होते, असा आशय ते प्रकट करतात.

वाङ्मयाकडे पाहण्याचा मोती बुलासांचा दृष्टिकोण नीतिवादी होता. ज्या वेळी 'मंजुघोषा', 'मुक्तामाला' यांसारख्या कादंबऱ्या प्रकाशित झाल्या, त्या वेळी मराठीत बीभत्स प्रहसने लोकप्रिय होती. पण या कादंबऱ्या आल्यामुळे लोकांचे लक्ष त्यांच्यावरून उडून कादंबऱ्यांकडे ओढले गेले. विशेषतः सन्मार्गबोधक स्त्रीचरित्र किंवा रामजी गणोजीकृत स्त्रीचरित्र यांसारख्या अनैतिकतेचा पुरस्कार करणाऱ्या पुस्तकांची आवड कमी झाली. अर्थात, त्रिवेणीप्रमाथ किंवा यशवंतराव आत्मचरित्र यांसारख्या कादंबऱ्या किंवा रेनॉल्डच्या कादंबऱ्यांची भाषांतरे अंतिमतः नुकसान करणारी आहेत, असे मत ते व्यक्त करतात.

पहिली वस्तुस्थितिदर्शक कादंबरी म्हणून ते 'वेणू' या कादंबरीचा नामोल्लेख करतात. या कादंबरीतील खेडेगाव, त्यातील 'चिकू सावकार', त्याच्या मुलाला लागलेली वाईट संगत आणि वेणूला म्हणजेच कादंबरीच्या नायिकेला तिच्या सासरी सोसाव्या लागणाऱ्या हालअपेष्टा यांचे लेखकाने वास्तवपूर्ण चित्रण केले आहे; म्हणून ते या कादंबरीचा गौरवपूर्ण उल्लेख करतात. वस्तुस्थितिदर्शक कादंबरीकारांमध्ये हरिभाऊ आपट्यांचा प्रथम क्रमांक लागतो; हे नोंदवून 'पूर्वी ज्या वेळी आजकालच्या गोष्टी हप्तेवारीने प्रसिद्ध होत असत, त्या वेळी मोठ्या उत्सुकतेने या गोष्टी वाचण्याकरिता 'पुणे वैभवा'ची वाट बघणारे वाचक आम्हांस ठाऊक आहेत. आजकालच्या गोष्टी ह्यांनी वाचक वर्गाच्या मतामध्ये बदल करून टाकल्या.' असे ते निभ्रांतपणे सांगतात. वस्तुस्थितिदर्शक कादंबऱ्या लिहिणाऱ्यांत स्त्रियांची नावे आहेत, याबद्दल ते आनंद प्रकट करतात. त्याचबरोबर अशा लेखिका संख्येने कमी आहेत, याबद्दल त्यांना वाईटही वाटते. काशीबाई कानिटकर यांची 'रंगराव' आणि मिस मेरी भोर यांची 'पुष्पकरंडक' या दोन कादंबऱ्यांचा ते गौरवपूर्ण उल्लेख करतात.

१९ व्या शतकातील ऐतिहासिक कादंबऱ्यांवरही मोती बुलासा यांनी भाष्य केले आहे. 'हंबीरराव व पुतळाबाई किंवा सत्तावन सालची धामधूम', 'छत्रपती संभाजी महाराज', 'जुना राजवाडा', 'सुशील यमुना अथवा वासुदेव बळवंत फडक्यांची धामधूम', 'जिंजीबास' या किंवा यांसारख्या कादंबऱ्या, भाषा, कथानक, अथवा व्यक्तिचित्रण यांपैकी कोणत्याच बाबतीत वैशिष्ट्यपूर्ण नाहीत, असे मत ते प्रकट करतात.

सर वॉल्टर स्कॉट किंवा बंकिमचंद्र चटर्जी यांच्या ऐतिहासिक कादंबऱ्यांमध्ये ज्याप्रमाणे त्या त्या वेळच्या सामाजिक, धार्मिक किंवा राजकीय स्थितीचे जसे हुबेहूब चित्रण आहे, तसे चित्रण मराठीतील ऐतिहासिक कादंबऱ्यांमध्ये नाही, याचे त्यांना वाईट वाटते.

मराठीतील भाषांतरित कादंबऱ्यांबद्दलही मोती बुलासा अभिप्राय व्यक्त करतात. त्यांच्या मते, पार्शी व उर्दू आणि संस्कृत भाषांमधून भाषांतरित केलेल्या कादंबऱ्या फारशा उपयुक्त नाहीत; कारण या दोन्ही भाषा मृत झाल्या आहेत; परंतु इंग्रजीतून झालेली भाषांतरे मात्र उपयुक्त आहेत. अशा भाषांतरांपैकी उदयपूरचा महाराणा










प्रतापसिंगजी, भावी सृष्टी, कुवलयपूरची राणी कुमुद्वती, वीरपत्नी निहालकुवर, अनाथ पांडुरंग, ठगाची जबानी, म्हैसूरचा वाघ या भाषांतरित कादंबऱ्यांचा निर्देश करून मोती बुलासा त्यावर भाष्य करतात. इथेही ते सुसंगतीचे मूल्य आधारार्थ वापरतात. वर निर्देशिलेल्या कादंबऱ्या ऐतिहासिक कथानकाच्या आधारे लिहिलेल्या असल्यामुळे त्या कथानकांशी जुळतील अशी आपल्या इतिहासातील कथानके शोधून लेखकांनी या कादंबऱ्यांत वापरली आहेत. परंतु स्थळवर्णनाच्या वेळी मात्र स्थळांची नावे आपल्या देशातील पण वर्णने इंग्रजी कादंबऱ्यांतील जशीच्या तशी उतरलेली, अशा प्रकारची विसंगती या कादंबऱ्यांत दिसून येते. शिलादित्य कादंबरीच्या आशयाबाबतही लेखकाने तारतम्य दाखवलेले नाही, असे मोती बुलासा स्पष्ट करतात. ते लिहितात : प्रोटेस्टंट व रोमन लोकांमध्ये इंग्लंडातील पहिल्या जेम्स राजाच्या वेळी जशी भांडणे होत होती व अधिकारापन्न प्रॉटेस्टंट मंडळीने ज्या तऱ्हेने कॅथलिक लोकांचा छळ केला, तसा प्रकार आमच्या देशात जैन व आर्य लोकांच्या भांडणाचा नाही. त्याचप्रमाणे आपल्या पुढे शंकराचार्य होता यावे म्हणून निरनिराळ्या राजांच्या साहाय्याने उत्पांताचार्यांनी जशा मसलती केल्या आहेत, त्या रोमच्या पोपला योग्य आहेत; पण आमच्या इकडची स्थिती भिन्न असल्यामुळे इकडच्या शंकराचार्याला त्या गोष्टी लागू नाहीत. अशीच आशयातील विसंगती, श्री विक्रमादित्य अथवा प्राचीन भरतभूमी या वासुदेव रंगनाथ शिरवळकर यांनी लिहिलेल्या कादंबरीत आहे, असे ते सोदाहरण स्पष्ट करतात. भाषांतर करताना मूळच्या संविधानकाच्या किंवा पात्रांच्या नावांत व त्या वेळच्या चालीरीतीत शक्यतो बदल करू नये. भाषांतर क्लिष्ट अथवा दुर्बोध झाले तर टिपा देऊन मूळ ग्रंथकाराचा अर्थ अधिक स्पष्ट करावा, अशी सूचनाही ते करतात.

आपले लेखक परक्या भाषेतील कादंबऱ्यांचे भाषांतर करतात, पण मूळ ग्रंथकाराचा उल्लेखही करीत नाहीत; ह्या कृतीबद्दल ते नाराजी प्रकट करतात. विक्रमादित्य अथवा प्राचीन भरतभूमी किंवा राणाभीमदेव या कादंबऱ्यांच्या मूळ ग्रंथकारांचा अथवा त्यांच्या कादंबऱ्यांचा भाषांतरकारांनी निर्देश केलेला नाही, हे स्पष्ट करून 'फुकाची प्रौढी मारण्याकरिता मूळ ग्रंथकारासंबंधाने आपले पवित्र कर्तव्य करण्यास विसरू नये', असा इशारा ते देतात.

याच लेखांमध्ये मोती बुलासांनी नव्याने येऊ लागलेल्या साहित्यप्रकाराकडे लक्ष वेधले आहे. 'करमणूक'मधून प्रसिद्ध होणारी सगुणाबाईची पत्रे किंवा उमरावती येथून प्रसिद्ध होणाऱ्या 'ती कळेल पण उमजले पाहिजे' या सदराखाली प्रसिद्ध होणारी पत्रे हा कादंबरीच्या जातीचा नवा प्रकार आहे, असे मोती बुलासा यांना वाटते. प्रीती, क्रोध, निर्भर्त्सना, सत्यानुराग अशा उच्च मनोवृत्तींनी युक्त अशी ही पत्रे आकर्षकही आहेत आणि वाचकाच्या मनात उदात्तभाव निर्माण करणारी आहेत, असा अभिप्राय ते प्रकट करतात.[५]

मोती बुलासांच्या या लेखाचे स्वरूप केवळ ऐतिहासिक नोंदीचे नाही. ॲरिस्टॉटलप्रणीत वाङ्मयीन मूल्ये मनाशी बाळगून त्यांनी १८९७ पर्यंतच्या कादंबरी-वाङ्मयाचे चिकित्सक परीक्षण केले आहे. इंग्रजी आणि बंगाली कादंबऱ्यांचे वाचन असल्यामुळे काही ठिकाणी तौलनिक विचारही त्यांनी प्रकट केले आहेत. मोती बुलासा यांच्या या लेखाच्या आधारे तत्कालीन सर्वसामान्य वाचकाच्या कादंबरीविषयक अभिरुचीबद्दलही माहिती मिळते. उदाहरणार्थ, पार्शी व उर्दू आणि संस्कृत भाषांमधून भाषांतरित केलेल्या कादंबऱ्या फारशा उपयुक्त नाहीत; कारण त्या दोन्ही भाषा मृत झाल्या आहेत, ही भूमिका प्रातिनिधिक स्वरूपाची आहे, हे सप्टेंबर १८४९ मध्ये लिबरल विचारसरणीच्या ब्राह्मणांनी मुंबई सरकारला सादर केलेल्या निवेदनातील मजकुराशी असलेल्या साम्या-वरून सहज ध्यानात येण्यासारखे आहे. या निवेदनात ते लिहितात, '...... समाजाच्या उन्नतीसाठी उपयोगी अशा मानव्य विद्या, भौतिक शास्त्रे आणि नीतिशास्त्रे यांच्या शिक्षणाची राष्ट्राला अधिक गरज आहे. संस्कृतसारख्या मृत भाषेतील ग्रंथांचा अभ्यास करून नव्हे, तर इंग्लिश-सारख्या जिवंत व प्रेरक साहित्याच्या अभ्यासातूनच राष्ट्राची खरी गरज भागेल.[६]

'मराठी काव्याचे परीक्षण करण्याची पद्धती, ब्रिटिश राज्यानंतर जेव्हा निबंध लिहिण्याची पद्धत सुरू झाली तेव्हापासूनच उत्पन्न झाली, असे म्हणता येणार नाही. त्या पूर्वीच्या काळातदेखील लोकांना मते होती व ती मते

ते व्यक्त करीत असत. त्या मतांचे विवरण मात्र करण्यात येत नसे.' हे डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर यांचे मत मान्य करून पुढे असे म्हणता येईल की, इंग्रजीतील समीक्षा वाचल्यामुळे आणि तिचे संस्कार झाल्यामुळे मराठी समीक्षेत विवरण, युक्तिवाद, उदाहरणे, यांचा अंतर्भाव होऊ लागला. पाश्चिमात्य वाङ्मयीन मूल्यांच्या कसोटीवर इथले साहित्य पारखले जाऊ लागले. मराठीतील अगदी पहिल्या समीक्षालेखातही याचा प्रत्यय येतो. का. बा. मराठे यांनी सन १८७२ मध्ये लिहिलेला 'नावल व नाटक ह्याविषयी निबंध' हा मराठीतील पहिला समीक्षात्मक निबंध आहे. हा निबंध प्रथमतः त्यांनी ज्ञानप्रसारक सभेपुढे वाचला. याची जन्मकथाही मजेशीर आहे. १८३५ ते १८७४ या काळात वेगवेगळ्या विषयांवरील ५० निबंधात्मक पुस्तके प्रसिद्ध झाली; पण कादंबरी व नाटक यांच्या स्वरूपाची चर्चा करणारा, वाङ्मयीन टीकेचा एकही निबंध कोणी लिहिला नाही. रा. ब. विष्णू परशुराम रानडे यांनी 'सद्या नावलें लिहिणारे व नाटकें लिहिणारें फार झाले आहेत; त्यांपैकी पुष्कळांस नावल अथवा नाटक असावें कसें, हें देखील माहीत नसतें. म्हणून कोणातरी चांगल्या विद्वानानें नावल व नाटक यांच्या स्वरूपाविषयी निबंध लिहावा.' अशी वारंवार जाहीर विनंती केली; पण त्यांना प्रतिसाद मिळाला नाही. म्हणून का. बा. मराठे यांनी हा निबंध लिहून १६/२/१८७२ रोजी मुंबईच्या ज्ञानप्रसारक सभेपुढे वाचला. १८३५ ते १८७४ या काळात प्रसिद्ध झालेला हा पहिला व एकमेव वाङ्मयविषयक निबंध आहे.

या निबंधात कादंबरीचे लेखन करताना कोणती काळजी घेतली पाहिजे आणि कोणत्या गोष्टी टाळल्या पाहिजेत, याचे विवेचन आहे. त्याचप्रमाणे तत्कालीन कादंबऱ्यांच्या कथानक, व्यक्तिचित्रण, भाषा या घटकांमध्ये कोणते दोष आहेत, याबद्दलही मराठे यांनी दिग्दर्शन केले आहे. ते आपल्या निबंधात इंग्रजीतील 'नॉव्हेल' या शब्दासाठी 'नावल' हा शब्द योजितात. आणि 'नावल' म्हणजे चमत्कारिक गोष्ट किंवा नवलसमूह अशी व्याख्या करतात. नावलाचे दोन प्रकार कल्पून ते त्यांचे विवरण पुढीलप्रमाणे करतात - 'एक, पुरुष सत्य; पण त्यांच्या हकीकतींत पुष्कळ असंभाव्य, मिथ्या व अद्‌भुत अशा गोष्टी घालून त्यांचे चरित्र मनोरंजक करावयाचें. दुसरा प्रकार असा की पुरुष मिथ्या; पण त्यांच्या संबंधाने ज्या गोष्टी सांगावयाच्या, त्या अगदीं संभाव्य, शक्य, स्वाभाविक असल्या पाहिजेत.' या दोन प्रकारांपैकी दुसऱ्या प्रकारातील कादंबऱ्या मराठीत मोठ्या प्रमाणात आहेत, असे निरीक्षण मराठे नोंदवितात. अशा कादंबऱ्यांचे वर्णन करताना ते लिहितात : 'जेवढे पुरुष तेवढे मदनाचे पुतळे, जेवढ्या स्त्रिया तेवढ्या तिलोत्तमा; प्रत्येक शोकस्थलीं मरणासारिखा शोक व आनंदस्थळी स्वर्गासारिखा आनंद, दुसरी उपमाच नाही. नवरा-बायकोचें भाषण म्हणजे प्रेमाचा लोट ! त्यात अभिप्राय गूढ राखणें किंवा गांभीर्यही बिलकुल नाहीत.' मंजुघोषा कादंबरीतील अनुप्रासाचा अतिरिक्त वापर ते उणीव म्हणून लक्षात आणून देतात.'

ॲरिस्टॉटलप्रणीत संभवनीयता, काळ, वेळ, स्थल आणि पुरुषस्वभाव यांची एकात्मकता आणि स्वाभाविकता ह्या मूल्यांच्या आधारे समकालीन कादंबऱ्यांचे परीक्षण करून ते आपली निरीक्षणे नोंदवितात. 'विचित्रपुरी', 'रत्नप्रभा', 'मंजुघोषा', 'मुक्तामाला' या कादंबऱ्यांतील उणिवा दाखवून देतात. 'आताशी नावलांची कीड फार झाली आहे', असा स्पष्ट अभिप्रायही ते देतात.[७]

विविधज्ञानविस्ताराच्या पुस्तक १०, अंक ३(१८७८) मध्ये महाराष्ट्र ग्रंथोत्तेजन या विषयावरील लेखात मराठीतील गद्यग्रंथ लिहिण्यामागील प्रेरणा आणि ते ग्रंथ निर्माण होण्यासाठी कोणकोणत्या लोकांचे प्रयत्न कारणीभूत झाले, याचे ऐतिहासिक रीत्या केलेले विवेचन आहे. त्यात, कादंबरी हा प्रकार इंग्रजी ग्रंथांच्या अनुकरणाने मराठीत सुरू झाल्याचे नोंदवून लेखक समाधान व्यक्त करतो. मोचनगड, गोदावरी, हंबीरराव आणि पुतळाबाई या कादंबऱ्यांत तत्कालीन लोकस्थिती, आचार-विचार, धर्म, राज्यप्रकरणांची हकीकत अशा मनोरंजक आणि उपदेशपर गोष्टींचे चित्तवेधक वर्णन आहे, असा अभिप्राय लेखक व्यक्त करतो. अलीकडे कादंबऱ्या आणि नाटके यांचे भरतेच आले आहे; परंतु ते सर्व एकाच पद्धतीने लिहिलेले असल्यामुळे वाचावेसे सुद्धा वाटत नाही, अशी तक्रार तो करतो.[८]

कादंबरी या साहित्यप्रकाराबद्दलचे मौलिक विवेचन करणारा निबंध वि. का. राजवाडे यांनी १९०२ साली

लिहिला. मराठीत अनेक भाषांतरित कादंबऱ्या आहेत. त्यांतील काही उत्कृष्ट आहेत आणि गेल्या दोन-तीन पिढ्यांतील आबालवृद्धांची त्यांनी करमणूक केली आहे, हे मान्य करूनही ते तक्रार करतात की, 'अद्यापि या ग्रंथांची अशी योग्यता आहे. तथापि त्यांच्यात एक मोठी-थोरली गोम आहे. ही ग्रंथोत्पत्ती आमच्या अस्सल प्रतिभेची अस्सल प्रजा नव्हे. .... आमचा आत्मा, आमचा स्वभाव, आमचा उत्साह, आमची महत्त्वाकांक्षा, आमचा पुरुषार्थ ह्या नकलेत, ह्या पाहुण्यात, ह्या दत्तकात बिलकुल दिसावयाचा नाही.' तत्कालीन वाचकांची अभिरुची काय होती या संबंधी ते लिहितात, '.... प्रस्तुत काळी सहृदय असे शिकलेले लोक पहावे तर ते उच्च प्रतीच्या युरोपियन कादंबऱ्या वाचण्यात गुंग झालेले दिसतात. ह्या लोकांना मराठी कादंबऱ्या वाचण्याला जो लावील व त्या वाचल्या नाहीत तर उत्कृष्ट विचारांना आपण मुकू असे जो त्यांना भावील, तोच उत्कृष्ट कादंबरीकाराच्या पदवीला प्राप्त होईल.'[९] राजवाड्यांचा अभिप्राय स्पष्ट आणि बोलका आहे.

येथपर्यंत आपण विद्वानांनी मांडलेले विचार पाहिले. त्या सर्वांनीच वास्तववादी कादंबऱ्यांकडील कल व्यक्त केला आहे. हरिभाऊंच्या कादंबऱ्या, वेणू शिरस्तेदार यांच्याबद्दल चांगले उद्गार काढले आहेत. जागतिक पातळी-वरील थोर कादंबऱ्यांच्या पंक्तीत मराठी कादंबरीचा अंतर्भाव होऊ शकत नसल्याचे नोंदविले आहे. एका बाजूला ही अशी प्रतिक्रिया, तर दुसऱ्या बाजूला मुक्तामालासारख्या कादंबऱ्यांच्या निघणाऱ्या अनेक आवृत्त्या या दोन टोकांच्यामध्ये तत्कालीन मराठी वाचकांची अभिरुची हेलकावे खात होती, असे दिसते. इथे आणखी एक गोष्ट लक्षात घेतली पाहिजे. महाराष्ट्रातील ९५% लोक त्या वेळी लिहिता-वाचता न येणारे होते. त्यांची वाङ्मय-विषयक अभिरुची कीर्तन-प्रवचन ललिते-भारुडे इ. मधून प्रकटत होती. हे सारे अद्‌भुताचे भांडार होते. अद्‌भुताच्या आधारे धार्मिक, नैतिक संस्कार करणे आणि समाजाची सांस्कृतिक एकसंधता टिकवून ठेवणे असे दुहेरी कार्य त्यातून होत होते. लावण्या-पोवाडे यांसारख्या सरंजामशाहीच्या अपत्यांचाही आस्वाद घेतला जात होता. असे संचित स्वीकारून अगदी विरोधी टोक असलेल्या पाश्चिमात्य किंवा युरोपीय साहित्य-परंपरेतील उत्तमोत्तम गोष्टी आत्मसात करणे सोपे नव्हते. वास्तववादी विचारसरणी, व्यक्तिवाद, विवेकनिष्ठा यांनी युक्त असे तत्त्वज्ञान उच्च पातळीपर्यंत शिक्षण घेतलेल्या लोकांना आवश्यक वाटत होते; पण सर्वसामान्य पातळीवरील वाचक अद्‌भुताकडे ओढला जात होता.

आतापर्यंत आपण कादंबरीविषयक लेख, १९ व्या शतकातील लोकांनी लिहिलेले कादंबरीचे इतिहास, यांच्याआधारे त्या काळातील अभिरुची समजून घेण्याचा प्रयत्न केला. आता, आपण वेगवेगळ्या कादंबऱ्यांवर लिहिलेली परीक्षणे, पुस्तकांना मिळालेला वाचकांचा प्रतिसाद, मुंबईचे वर्णन, पुणे वर्णन यांसारख्या ग्रंथांमधील स्फुटअभिप्राय, चरित्रे, आत्मचरित्रे यांतून प्रकटलेली आवड-निवड, वृत्तपत्रांतील, नियतकालिकांतील वृत्ते व अभिप्राय तसेच विविध ठिकाणी प्रसिद्ध झालेल्या कादंबऱ्यांच्या जाहिराती यांच्याआधारे १९ व्या शतकातील लोकांची कादंबरीविषयक अभिरुची समजून घेऊ.

**परीक्षणे :**

प्रत्येक कृती उत्पन्न होते तेव्हापासूनच तिचे परीक्षण लोकांकडून होऊ लागते. मराठीमध्ये कादंबरीच्या निर्मितीचा प्रारंभ १९ व्या शतकात झाला आणि परीक्षण, समीक्षण करण्याची रीतही १९ व्या शतकाच सुरू झाली. मराठीतील नियतकालिकांचा इतिहास पाहिला तर असे दिसते की, पहिले उपलब्ध मराठी वृत्तपत्र १८३२ साली सुरू झाले.[१०] बातमी देणे, टीकाटिप्पणी करणे यांच्याबरोबरीने नव्याने छापल्या गेलेल्या पुस्तकांची परीक्षणे देणे, असेही धोरण या वृत्तपत्रांनी ठेवले. वृत्तपत्रांप्रमाणेच साप्ताहिके, पाक्षिके आणि मासिकेही हळूहळू येऊ लागली. त्यांत पुस्तक-परीक्षणाला विशेष जागा मिळू लागली. विविधज्ञानविस्तार, केरळकोकिळ, निबंधचंद्रिका, मनोरंजन, करमणूक, शालापत्रक इ. मधून परीक्षणे छापली जाऊ लागली. त्याचप्रमाणे ज्ञानोदय, इंदूप्रकाश, सुबोधपत्रिका, निबंधमाला यांतूनही अभिप्रायवजा परीक्षणे, स्फुटलेखन येऊ लागले.

१९ व्या शतकामध्ये छापली गेलेली जी कादंबऱ्यांची परीक्षणे उपलब्ध आहेत, त्यांचे विश्लेषण करताना काही गोष्टी चटकन लक्षात येतात. त्यांपैकी पहिली ठळकपणे लक्षात येणारी बाब/गोष्ट म्हणजे परीक्षणकर्त्यांचा

वैशिष्ट्यपूर्ण दृष्टिकोण. १९ व्या शतकाच्या उत्तरार्धात भोवतालच्या जीवनाकडे आणि घटनांकडे बघण्याचे, साम्राज्यवादी दृष्टिकोण आणि राष्ट्रवादी दृष्टिकोण असे दोन दृष्टिकोण निर्माण झाले होते. या दृष्टिकोणांचे प्रतिबिंब कादंबऱ्यांच्या परीक्षणांतही पडलेले दिसते. दयाळू इंग्रजांचे साम्राज्य इथे शासित झाले याबद्दल कित्येक लोकांच्या मनात कृतज्ञतेची भावना होती. इंग्रजांची, राज्यकर्त्यांची प्रत्येक गोष्ट चांगली आणि योग्य तसेच एतद्देशीय म्हणजे अडाणी, मागासलेले, रूढींच्या, परंपरांच्या चौकटीत अडकून पडलेले, बुरसटलेल्या विचारांचे अशी त्यांची विचारसरणी होती. कित्येक कादंबरीकारांनी आपल्या कादंबऱ्यांमधून अशीच विचारसरणी अभिव्यक्त केली. या कादंबऱ्यांचे परीक्षण करतानाही साम्राज्यवादी दृष्टिकोण असलेल्या परीक्षकांनी हाच मापनदंड वापरला. ब्रिटिशांनी ज्या सुधारणांचा/तत्त्वांचा पुरस्कार केला, त्या सुधारणा आणि तत्त्वे यांनाच मापनदंडाचे स्वरूप प्राप्त झाले. एवढेच नव्हे, तर कित्येकांनी कादंबरीबद्दल लिहिण्याऐवजी त्या-त्या सामाजिक प्रश्नांबद्दल अथवा तत्त्वांबद्दलच लिहिले. या संदर्भात श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांचा 'पण लक्षात कोण घेतो!' या कादंबरीचे परीक्षण करणारा लेख आवर्जून पाहण्यासारखा आहे. ते कादंबरीबद्दलचे विचार तीन परिच्छेदांत सांगतात आणि उरलेल्या सर्व लेखात केशवपनाच्या चालीबद्दलचे विचार मांडतात.[११] 'यमुनापर्यटन' या कादंबरीला दादोबा पांडुरंगांनी लिहिलेली प्रस्तावनाही पाहण्यासारखी आहे. त्यात कादंबरीबद्दल एकही शब्द नाही. (तिला 'कादंबरी' म्हणणे युक्त होईल काय, यासंबंधीचे विवेचन यापूर्वी केलेले आहे. पहा प्रकरण दोन पृ.) विधवांचे दुःख याच विषयाचे विवेचन आहे. ब्रिटिशांच्या सामाजिक सुधारणांच्या पुरस्काराने हे लोक इतके प्रभावित झाले होते की, आपण कादंबरी-संबंधी लिहितो आहोत, याचेही भान त्यांना राहिले नाही. अर्थात या प्रकारच्या परीक्षणांना संपूर्णपणे साम्राज्यवादी असे संबोधता येणार नाही.

सामाजिक सुधारणांच्या पुरस्काराप्रमाणेच ख्रिश्चन धर्माचा अतिरेकी प्रचारही काही परीक्षणकर्त्यांना खपत नव्हता. उदाहरणार्थ, 'पुष्पकरंडक' या कादंबरीच्या परीक्षणाच्या शेवटी परीक्षणकर्ता लिहितो की, 'काही मित्रांचे म्हणणें असें आहें कीं यांत ओतप्रोत ख्रिस्तीमत ओंतले आहे व हा या पुस्तकांत मोठा दोष आहे. आमचें मत असें नाही. ज्याला त्याला धर्मांची प्रीति आणि स्वधर्माचा अभिमान वाटणें अगदीं साहजिक आहे. प्रायः आपण स्वधर्मप्रीति मोठें भूषणच मानतो. असें जर आहे आणि ग्रंथकर्ती जर ख्रिस्तमतानुयायी आहे तर तिनें तसें करणें हेंही रास्त आहे. पण आम्ही हा दोष नाहीं एवढेच म्हणून थांबत नाही. ख्रिस्ती धर्मांचे जे शांत उदात्त क्षमाशीलतेचें, सात्त्विकतेचें व ईश्वरनिष्ठेचें ब्रीद या पुस्तकांत गायिले आहे, तशा प्रकारचा ख्रिस्ती धर्म आम्हांस काय, परंतु सर्व सुविचारी जनांस आदरणीयच होईल यांत आम्हांस अगदी शंका नाही.'[१२]

'१८५७ सालचे बंडाची धामधूम किंवा हंबीरराव आणि पुतळाबाई' ह्या कादंबरीत एतद्देशीय लोक नैतिकदृष्ट्या स्खलनशील आहेत आणि ब्रिटिश लोक उदात्त विचारांचे परोपकारी तसेच पराक्रमी आहेत असे चित्रण आहे. या ग्रंथाचे दक्षिणाप्राईज कमिटीच्या सन्मानासाठी तीन लोकांनी परीक्षण केले. या तिघांनीही या कादंबरीला पारितोषिक द्यावे, अशीच शिफारस केली आहे. मात्र त्या प्रत्येकाच्या दृष्टिकोणात फरक आहे. रावजी शास्त्री गोडबोले[१३] यांचा दृष्टिकोण ब्रिटिशांचे केलेले चित्रण यथायोग्य आहे असे सांगणारा आहे. थॉमस कॅन्डी[१४] यांनी लॉर्ड कॅनिंगसाहेब यांचे केलेले वर्णन योग्य नाही, असे म्हटले आहे; एवढेच नव्हे तर नानासाहेबास पेशवा म्हटल्याबद्दलही नाराजी प्रकट केली आहे. महादेव गोविंद रानडे[१५] यांचे मत मात्र वेगळे आहे.

ब्रिटिशांच्या साहित्यशास्त्राच्या परिचयामुळे आपल्याला परीक्षणाचे नवे मापनदंड मिळाले. ॲरिस्टॉटलने सांगितलेले अंतर्गत सुसंगती आणि संभवनीयता हे दोन मापनदंड मोठ्या प्रमाणात स्वीकारले गेले. कादंबऱ्यांच्या परीक्षणांमध्येही ते स्पष्टपणे दिसते. 'वसंतमाला' या कादंबरीच्या विविधज्ञानविस्तारातील (१८६८) परीक्षणात "संविधानकामध्ये संगती असली पाहिजे", "पात्रांची स्थिती हुबेहूब दिसून वाचकांच्या मनावर तिचा पूर्ण ठसा उठवण्याकरिता अनेक स्वाभाविक गोष्टींच्या वर्णनाकडे विशेष लक्ष दिले पाहिजे", असे प्रतिपादले आहे.[१६] 'विश्वासराव' कादंबरीचे परीक्षण करताना लेखक म्हणतो की, 'कल्पित

गोष्ट म्हणजे पृथ्वीच्या रहाटीची नक्कल किंवा अनुकरण आहे. ... कल्पित गोष्टीत प्रत्येक निमित्त संविधानात नीट लागू झाले पाहिजे व ते जागच्या जागी आणण्यास कारण पाहिजे... असंभवनीय निमित्तांचे व अशक्य मानवी स्वभावाचे अवलंबन कदापि करू नये.'[१७] अंतरिक सुसंगती आणि संभवनीयता या दोन्ही निकषांच्याआधारे परीक्षण करून लेखक किंवा परीक्षणकर्ता 'विश्वासराव' ही कादंबरी गुणवत्तेच्या बाबतीत चांगली नसल्याचे मत नोंदवतो. पाश्चिमात्य साहित्यशास्त्रातील हे निकष त्या काळातील बहुसंख्य लोकांनी स्वीकारलेले दिसतात. 'मित्रचंद्र', कादंबरीचे परीक्षण (निबंधचंद्रिका, अंक ३६वा) किंवा 'छत्रपती संभाजी महाराज अथवा राजाचे दुष्कर्म राजाला भोवतें व प्रजेलाही भोंवते.' या कादंबरीचे परीक्षण (निबंधचंद्रिका, अंक २९) ही दोन परीक्षणे उदाहरणादाखल सांगता येतील. अंतर्गत सुसंगती आणि संभवनीयता या निकषांचा वापर करण्याच्या प्रवृत्तीला ब्रिटिश साहित्यविचाराचा प्रभाव कारणीभूत झालेला दिसतो.

इंग्रजी पद्धतीचे शिक्षण, ब्रिटिशांची वैचारिक परंपरा आणि साहित्यपरंपरा यांचा परिचय आणि अभ्यास केल्यावर त्या प्रभावाखाली न येता, राष्ट्रीय भावनेतून भोवतालच्या घटनांकडे आणि वस्तुस्थितीकडे पाहण्याचा मार्गही १९ व्या शतकात काही विचारवंतांनी पतकरला. विशेषतः न्या. म. गो. रानडे यांचे या बाबतीतील कार्य महत्त्वपूर्ण आहे. रानडे यांचा 'एसेज् ऑन इंडियन इकॉनमिक्स' हा ग्रंथ म्हणजे अभिजात ब्रिटिश अर्थशास्त्रज्ञांच्या झापडबंद आणि पारंपरिक स्वरूपाच्या भूमिकेवर तर्कशुद्ध आणि जोमदार अशी राष्ट्रवादी प्रतिक्रिया म्हणता येईल, तर त्यांचा 'राईज् ऑफ मराठा पॉवर' हा ग्रंथ म्हणजे स्वराज्य संस्थापक शिवाजीमहाराजांबद्दल पाश्चिमात्य इतिहासकारांच्या साम्राज्यवादी भूमिकेचा सखोल आणि अभ्यासपूर्ण असा ओजस्वी राष्ट्रवादी प्रतिवाद ठरेल. 'राईज ऑफ मराठा पॉवर' हा ग्रंथ 'राष्ट्रवादी इतिहास' या संज्ञेचा सकलार्थ पूर्ण सामर्थ्यानं व्यक्त करणारं उत्तम उदाहरण म्हणता येईल.[१८] रानडे यांची भूमिका तसेच अन्य उदारमतवादी लोकांची भूमिका, विष्णूशास्त्री चिपळूणकरांची स्वाभिमानी भूमिका, टिळकांची आक्रमक भूमिका या सगळ्याचा परिणाम होऊन महाराष्ट्रातील सुशिक्षितांत १९ व्या शतकाच्या उत्तरार्धात झालेल्या सांस्कृतिक पुनरुज्जीवनातून येथील लोकांचा स्वाभिमान उफाळून आला आणि त्यामुळे येथील राष्ट्रवादाला भावनेचे नवे सामर्थ्य प्राप्त झाले. साहित्यव्यवहारावरही याचा परिणाम झाला. जुन्या संस्कृत ग्रंथांची मराठीत भाषांतरे झाली. त्याचप्रमाणे मोरोपंत, वामन पंडित, तुकाराम, रामदास, मुक्तेश्वर यांचे काव्य प्रसिद्ध करण्यात आले. बखरी, पोवाडे यांचेही संपादन करण्यात आले. या माहितीच्या आधारे ऐतिहासिक कादंबऱ्या व नाटके लिहिली जाऊ लागली व त्यांमधून स्वधर्माचा, देशाचा व परंपरेचा गौरव करण्याची प्रथा रूढ झाली. हाच राष्ट्रवादी दृष्टिकोण कादंबऱ्यांच्या परीक्षणांमध्येही आढळतो.

'शालापत्रक' (पुस्तक ५, अंक १०) मध्ये 'घाशीराम कोतवाल' या कादंबरीचे परीक्षण आहे. या परीक्षणामध्ये राष्ट्रवादी दृष्टिकोण स्पष्टपणे दिसून येतो. परीक्षणाच्या सुरवातीलाच परीक्षणकर्ता सांगतो की, पंधरा-वीस वर्षांच्या मागे लोक इंग्रज सरकारची हांजीहांजी करीत होते; पण आता लोक डोळस झाले आहेत. लॉर्ड डलहौसी यांच्या कारकिर्दीचे विवेचन आता कोणी पहिल्यासारखे करणार नाही. हा जो तारतम्यभाव लोकांमध्ये आला आहे, तो या ग्रंथात नाही. 'घाशीराम कोतवाल' या कादंबरीमध्ये एकांगी चित्रण आहे. मराठे किंवा महाराष्ट्रीय लोकांचे अडाणीपण वर्णून ब्रिटिश व मुसलमान लोक बुद्धिवान आणि कर्तृत्ववान असल्याचे दाखविले आहे. ह्या चित्रणातील एकांगीपणा दाखवून देऊन परीक्षणकर्ता म्हणतो की, 'या पुस्तकात आणिक एक चूक झाली आहे. ती अशी कीं, एकट्या मराठ्यांची तुलना सर्व जगाशी करून त्यांस अगदी क्षुद्र असें दाखविले आहेत.'[१९] (पान नं. २२५) इतिहासाचा अपलाप करून राज्यकर्ते म्हणजे ज्ञानाचे, पराक्रमाचे आगर आणि एतद्देशीय तेवढे सगळे आळशी, अज्ञानी आणि कामचुकार ही साम्राज्यकर्त्यांची भूमिकाच आपली म्हणून पतकरून लेखकाने या कादंबरीत कथानकाचा केवळ सूत्र म्हणून वापर करून विलक्षण प्रकारची माहिती दिली आहे. ह्या वृत्तीमुळे कादंबरीचे कादंबरीपणही नाहीसे झाले आहे आणि तिची गुणवत्ताही खालावलेली आहे. कादंबरीतील बराचसा मजकूर कादंबरी या प्रकारास शोभणारा नसल्यामुळे गाळला असता तरी

चालले असते, असे मत प्रकट करून परीक्षणकर्ता असे सुचवितो की, स्कॉटने स्कॉटलंडमधील डोंगरात राहणाऱ्या लोकांचे केलेले चित्रण आपल्याला आवडते; कारण त्या कवीच्या मनात स्वदेशाभिमान होता. (इत्यर्थ हा की, स्वदेशाभिमानाच्या अभावामुळे घाशीराम कोतवाल अप्रिय वाटते.) नी. ज. कीर्तने यांचा राष्ट्रवादी दृष्टिकोण या लेखात स्पष्टपणे दिसून येतो.

भाषांतराच्या बाबतीतही राष्ट्रवादी दृष्टिकोण दिसून येतो. 'विषवृक्ष' कादंबरीचे परीक्षण करताना [२०] सुरवातीलाच ही कादंबरी मूळ बंगालीतील असून तिच्या इंग्रजी रूपांतराचे भाषांतर आहे, असे स्पष्ट करून या कादंबरीप्रमाणेच अन्य काही बंगाली कादंबऱ्यांची भाषांतरे प्रथम इंग्रजीत होऊन मग त्या मराठीत रूपांतरित होतात, याबद्दलचे तीव्र असमाधान परीक्षणकर्ता व्यक्त करतो. 'पाच हजार मैलांपलीकडील लोकांनी येऊन आमच्या देशातील ग्रंथांची इंग्रजीत भाषांतरे करावीत व नंतर त्यावरून ... ती मराठीत उतरावीत हे लांछनास्पद नव्हे काय?' ही कादंबरी एकदातरी वाचावी अशी शिफारस करून परीक्षणकर्ता म्हणतो की, 'रा. रा. देव अथवा वंगभाषाभिज्ञ कोणीतरी दुसरे कादंबरीप्रिय ग्रंथकार वंग-देशस्थ कादंबऱ्यांस जर महाराष्ट्रीय पेहेराव देऊन तद्देशस्थ ग्रंथकारांशी आमचा परिचय करून देण्याचा सुयोग जमवून आणतील, तर तो प्रसंग आम्ही मोठ्या उत्सवाचा व आनंदाचा समजूं!'

परीक्षण करताना बव्हंश परीक्षकांनी पाश्चिमात्य साहित्यशास्त्रातील संकल्पना वापरल्या आहेत. क्वचित प्रसंगी 'ह्या ग्रंथात मुख्यत्वे करुणरस आणि स्थलविशेषी भक्तिरस या दोहोंचीच योजना आहे;' अशा प्रकारचे उद्‌गार काढले असले (पुष्पकरंडक - विविधज्ञानविस्तार) तरीही या कादंबऱ्यांचे आलंबन व उद्दीपन, विभाव, अनुभाव, व्यभिचारीभाव इ. संकल्पनांच्या मदतीने तसेच बारकाईने आणि तपशीलाने परीक्षण केल्याचे आढळत नाही. कादंबरीत प्रतीत होणाऱ्या रसाच्या पुष्ट्यर्थ स्थायी-भाव, विभाव, अनुभाव साधारणीकरण ह्या संकल्पनांचा वापर सफाईदारपणे केलेला आढळत नाही. 'मुक्ता' या कादंबरीचे परीक्षण मात्र काहीसे अपवादभूत मानावे लागेल. कादंबरीने बोध किंवा उपदेश करावा अशी अपेक्षा बाळगूनही काही परीक्षणे लिहिलेली आढळतात. 'उदयांवरची गोष्ट' या कादंबरीवरील परीक्षणामध्ये 'या गोष्टीच्या वाचनापासून केवळ लहान मुलांनाच नव्हे तर जाणत्या माणसांनाही बोध घेण्यासारखा आहे', असे सांगून बोधाचा सद्हेतू मनात धरून कादंबरी लिहिल्याबद्दल लेखकाचे अभिनंदन केले आहे. कादंबरीत अनेक दोष असले तरीसुद्धा तिकडे दुर्लक्ष करून परीक्षणकर्ता लेखकाचे अभिनंदन करतो. 'शिक्षक' कादंबरीचे परीक्षण करतानाही ती केवळ मनोरंजकच नाही तर राजनीती, सदसत विचार यांच्या संदर्भात बोधपर आहे. वाचकांनी तिची उपेक्षा करता कामा नये; असा अभिप्राय व्यक्त केला आहे. एवढेच नव्हे तर कादंबरीचा उत्तरार्धही मनोरम आणि बोधपर होईल असे अनुमान करून तो लवकरात लवकर प्रसिद्ध करण्याची आग्रहपूर्वक विनंती केली आहे.[२१] 'शिरस्तेदार' कादंबरीच्या परीक्षणामध्ये, लाच खाण्याचा अतिशय निंद्य असा प्रकार नष्ट करण्यासाठी या पुस्तकाचा उपयोग झाला, तर आम्ही आमच्या ग्रंथ-काराच्या श्रमाचे साफल्य झाले असे मानू (विविधज्ञान-विस्तार), असे स्पष्टपणे नोंदविले आहे.

बोधाच्या अपेक्षेप्रमाणेच कादंबरी स्त्रिया-मुलांसह सर्वांना वाचण्याजोगी असावी असा कटाक्ष अनेक परी-क्षणांमध्ये स्पष्टपणे आढळतो. 'प्रेमबंधन' कादंबरीचे परीक्षण करताना लेखक किंवा परीक्षक भाषा फार चावट आहे, स्त्रियांनी वाचण्याच्या उपयोगी नाही, असे स्पष्टपणे सांगतो.[२२] 'मुक्ता' या कादंबरीत पदोपदी अश्लील-पणा आढळून येतो असे म्हणून तिच्या परीक्षणात परीक्षकाने अनेक उदाहरणे दिली आहेत. अश्लीलत्व हा या कादंबरीतील सर्वांत मोठा दोष आहे, असे म्हणून 'शुकाचार्यांससुद्धा रंगेल बनवण्याइतकी शृंगाराची जय्यत तयारी या ग्रंथात आहे, असा अभिप्राय देऊन पुढे 'किंमत' बरीच भारी असल्यामुळे याचा प्रसार होण्याची फारशी भीती नाही आणि याच ग्रंथकाराचे 'कामशास्त्र' नावाचे छोटेखानी पुस्तक ज्याप्रमाणे फुकट मिळत असल्यामुळे सर्वत्र दिसून येते, त्याप्रमाणे हे दिसून येणार नाही.' अशी खवचट आशा व्यक्त केली आहे.

'विश्वासराव' कादंबरीचे परीक्षण करताना परीक्षक स्पष्टपणे सांगतो की, लेखकाने जरी हे पुस्तक सभ्य

स्त्रियांस वाचण्यासाठी आहे असे म्हटले असले, तरी हिंदू सभ्य स्त्रिया यातील काही भागांस शिवणार नाहीत. इतकेच नव्हे तर पृष्ठ क्रमांक ११० ते १९९ वरील मजकुराकडे मध्यम सदाचरणाचा पुरुषसुद्धा ढुंकूनही पाहणार नाही. ...असे लाजिरवाणे भाग अवलियाखेरीज करून बाकी कोणत्याही पुस्तकात सापडणार नाहीत. शिवशिव!! अशी पुस्तके स्त्रियांस वाचण्याकरिता! १९ व्या शतकामध्ये मजकराच्या शील-अश्लीलतेबाबत तसेच स्त्रियांनी व मुलांनी काय वाचावे, काय वाचू नये याबाबत कोणते मतप्रवाह होते, ते या परीक्षणावरून दिसून येते.[२३]

आपल्या कादंबऱ्या मग त्या स्वतंत्र असोत की भाषांतरित, त्यांत परधार्जिणेपणा, दुसऱ्या कादंबऱ्यांची नक्कल अथवा उचलेगिरी आढळते, याबद्दल १९ व्या शतकातील परीक्षकांनी अतिशय खंत आणि नाराजी व्यक्त केलेली दिसते. 'रत्नमाला आणि प्रतापचंद्र' या कादंबरीच्या परीक्षणामध्ये कादंबरीकाराने 'विचित्रपुरी'तील ऋतुवर्णन पुढे ठेवून त्याची ओबडधोबड प्रतिमा वठविली आहे. किंवा 'वीरबाहूची गुहा', 'तारा' नाटकातील राघोबाच्या गुहेचे तंतोतंत अनुकरण आहे, अशी उचलेगिरी स्पष्ट करून निषेध नोंदविला आहे. 'मुक्ता' कादंबरीमध्ये किती मोठ्या प्रमाणात कोठून कोठून नक्कल केली आहे आणि करतानाही आपले चोरीचे गुप्तकृत्य लपविण्यासाठी लेखकाने कोणते उपाय केले आहेत आणि त्यामुळे अर्थाचा कसा गोंधळ उडाला आहे, याकडे परीक्षणकर्त्याने लक्ष वेधले आहे.

'छत्रपती संभाजी महाराज अथवा राजाचे दुष्कर्म राजाला भोंवतें व प्रजेलाही भोंवतें' या कादंबरीच्या परीक्षणाच्या प्रारंभीच ही कादंबरी स्वतंत्र नसून कित्येक इंग्रजी कादंबऱ्यांच्या आधारे लिहिली आहे, असे विधान केले आहे. पुढे इंग्रजीतील उत्कृष्ट कादंबऱ्यांची भाषांतरे होणे अथवा त्यांच्या आधारे कादंबऱ्या लिहिणे इष्ट असले तरी, '... इंग्रजी ग्रंथांतली आयती बनविलेली गोष्ट अथवा भागचे भाग भाषांतर करून घेऊन त्या गोष्टीचा मागमूसही लागू न देणे यासारखा कृतघ्नपणा व बेइमानीपणा दुसरा नसेल! दुसऱ्याचा मजकूर त्याचा उल्लेख न करितां-अर्थात चोरून-घेऊन ती आपलीच कल्पना आहे असें भासविणें, यासारखें ग्रंथकाराचे कीर्तीस बट्टा लावणारें दुसरें कांहीं नसेल!' असे बजावून ना. वि. बापटांनी या कादंबरीतील मुख्य गोष्ट 'Romance of History, India' या पुस्तकातील 'The Mahratta chief' या गोष्टीच्या आधारे लिहिले आहे एवढेच नव्हे, तर कादंबरीचे दहावे प्रकरण आणि पुढीलही प्रकरणे अक्षरशः काही ठिकाणी नावांत बदल करून भाषांतरित केली आहेत, असे परीक्षणकर्ता म्हणतो. 'Romance of History, India' हे पुस्तक एका पाद्रीने लिहिले आहे. त्याला आमचा धर्म व रीतीभाती यांची माहिती नसल्यामुळे त्यात विसंगपणा, अमंगलपणा आणि चारित्र्यहनन केले आहे. त्याचेच भाषांतररूप थोड्याफार फरकाने 'छत्रपती संभाजी महाराज' या कादंबरीत अवतरल्यामुळे कादंबरीची गुणवत्ता खालावली आहे; असा या परीक्षणाचा रोख आहे. परीक्षणकर्ता स्कॉटच्या कादंबऱ्या आणि सोल्जर्स वाईफ या कादंबरीतील एक प्रसंग यांच्याबरोबर तुलना करून कादंबरीतील उणिवा स्पष्ट करतो. 'छत्रपती संभाजी महाराज' ही कादंबरी ऐतिहासिक स्वरूपाची असल्यामुळे त्यातील ऐतिहासिक वास्तव अचूकपणे वर्णिले पाहिजे, अशी अपेक्षा व्यक्त करून परीक्षणकर्ता कादंबरीतील स्थळ, काळ तसेच व्यक्तींच्या आयुष्यातील घटना यांबाबतीत लेखकाने खोटारडेपणा केला आहे असे साधार मांडून पुढे खोटारडेपणामुळेच इतिहास जाणणाऱ्या वाचकांना या कादंबरीचा कंटाळा येतो व ग्रंथकाराच्या अविचारीपणाबद्दल वाईट वाटते, असा अभिप्राय देतो. खोटारडेपणामुळे आम्हांला हे पुस्तक हातीं धरू नये असे वाटते; परंतु त्यांतील लेखन खोटे नसून खरे आहे असे ठरल्यास या कादंबरीला आम्ही 'बरी' म्हणू असे परीक्षणकर्ता परखडपणे लिहितो.[२४]

आपल्या इतिहासाचा अभिमान आणि या गौरवशाली इतिहासाचे विपरीत वर्णन करणाऱ्यांचा खरपूस समाचार घेण्याची राष्ट्रीय वृत्ती या परीक्षणांमध्ये ओतप्रोत भरलेली दिसते. त्याचप्रमाणे भाषांतरे असावीत पण उचलेगिरी नसावी, असा एक मूल्यविवेकही या परीक्षणात स्पष्टपणे दिसून येतो.

न्यायमूर्ती म. गो. रानडे यांनी 'रत्नप्रभा' या कादंबरीवर विस्तृत अभिप्राय लिहिला. तो अतिशय मार्मिक आहे.

त्यांच्या मते, - तरुण स्त्री-पुरुषांनी परस्परांवर प्रेम करण्याला आपल्या समाजात अवसर नाही. आई-बापांनी लग्न करून दिल्यानंतर त्या स्त्री-पुरुषांनी आमरण एकमेकांच्या सहवासात दिवस काढावयाचे असा इथला रिवाज आहे. अशा स्थितीत असल्या प्रेमाचा विषय रंगवणे सुकर नाही. तरुण स्त्री-पुरुषांची एकमेकांचा पूर्वी परिचय नसता प्रथमच एखाद्या चमत्कारिक प्रसंगाने विलक्षण परिस्थितीत गाठ पडलेली दाखवून युरोपियन स्त्री-पुरुषांप्रमाणेच त्यांच्या तोंडी उत्कट प्रेमाची भाषणे घातल्यास आमच्या सामजिक रीती-भातींशी ती विसंगत असल्याने वाचकांना रुचणार नाहींत. युरोपियन समाजांत व आमच्या समाजांत विवाहासंबंधी असा भेद असल्याने युरोपियन लेखकांनी लिहिलेल्या कादंबऱ्यांतील स्त्री-पुरुषांच्या प्रेमाची वर्णने हिंदी मनावर परिणाम करीत नाहीत. यामुळें कादंबऱ्यांतून हा विषय अतिशय सावधपणानें उपयोगात आणला पाहिजे. नाही तर नीतिमत्तेला धोका बसून घोटाळे माजतील असा इशारा रानडे देतात. आतापर्यंतची आमची कथा-अभिरुची अद्भुत, पाल्हाळिक, पाणचट किंवा विनोदी कथांनी सिद्ध झाली आहे. त्यातील विस्मयजनक व अत्युक्तिमय चमत्कारामध्ये आपले मन रमते. विश्वसनीय आणि अस्सल अशा वाङ्मयाची रचना यापूर्वी झाली नसल्यामुळे वाङ्मयाचा आस्वाद घेताना तसल्या चित्राची अपेक्षा कोणी धरत नाही, असे विचार प्रकट करून कथात्मक वाङ्मयाबद्दलची इथली अभिरुची आणि पाश्चात्त्यांची अभिरुची ह्यांतील फरक रानडे नोंदवितात.[२५]

शामभट्ट आणि त्यांचा शिष्य बटो यांचा वृत्तांत या कादंबरीवर अनुकूल अभिप्राय देताना रानडे बऱ्याच वर्षांत अभिप्रायाकरता आलेल्या पुस्तकांतील चांगले पुस्तक असे निःसंदिग्धपणे म्हणतात. हे डॉन क्विक्झोट या कादंबरीचे भाषांतर आहे. मूळ गोष्टीत ज्याप्रमाणे मुख्य नायक डॉन क्विक्झोट व त्याचा नोकर सांकोपांझा यांचे हुबेहूब चित्र वठविलेले आहे त्याप्रमाणे या कादंबरीत शामभट्ट व बटो यांचे चित्र चांगले वठविले आहे, असे मत नोंदवून रानडे 'इंग्रजीतून ग्रंथ स्वभाषेत करणे झाल्यास मुळास किती चिकटून रहावे व कोठपर्यंत रूपांतर करावे याविषयी नियम घालून देता येत नाहीत; तथापि आपटे यांनी ज्याप्रमाणे रूपांतर करून ही गोष्ट रचली आहे, तशा गोष्टी रचल्या गेल्या तर मराठी भाषेची उन्नती खचित होईल', असे म्हणतात.[२६]

'निबंधमाले'मध्ये विवेचनाच्या ओघात काही कादंबऱ्यांवरील अभिप्राय स्पष्टपणे व्यक्त झाला आहे. 'भाषापद्धती'बद्दल लिहिताना विष्णुशास्त्री चिपळूणकर स्पष्टपणे सांगतात की, नव्या कादंबऱ्यांत आम्हीं अद्याप जितक्या वाचल्या आहेत तितक्यांत 'मुक्तामाला !', 'बोधसुधा' व 'हंबीरराव आणि पुतळाबाई' या आमच्या मतें उत्तम आहेत.[२७] तर 'ग्रंथांवर टीका' यासंबंधी लिहिताना वक्तृत्वपूर्ण उद्‌गार काढतात की, 'मंजुघोषे'सारखी कादंबरी मोठ्या शानदान पुठ्ठ्यांनी बांधवून त्यांवर मोठे नामी असें मिन्याचें किंबहुना जडावाचे काम केले म्हणजे ती पुस्तकें खरोखरी वाचनीय झाली काय?[२८] मेडोज टेलरच्या 'तारा', 'सीता', 'ठगाची जबानी' या कादंबऱ्यांबद्दल चिपळूणकरांनी गौरवोद्‌गार काढले आहेत. तीस वर्षांच्या इथल्या वास्तव्यात इथल्या लोकांशी मिळूनमिसळून वागल्यामुळे हिंदू-मुसलमान व सर्व जातींचे अगदी घरगुती रीतीरिवाजसुद्धा लेखकाला माहीत झाले होते व ते त्याच्या कादंबऱ्यांतून प्रकट झाले आहे.[२९] असे मत चिपळूणकर प्रकट करतात.

'ज्ञानोदय' या वर्तमानपत्रामध्येही अल्पप्रमाणात का होईना, तत्कालीन कादंबऱ्यांविषयीचे अभिप्राय व्यक्त झालेले दिसतात. १५ मार्च १८५९ च्या ज्ञानोदयच्या अंकात पुस्तके व निबंध प्रसिद्ध करणाऱ्या मंडळीच्या सभेचा अहवाल आहे. या अहवालावरून असे दिसते की, गेल्या वर्षी (१८५८) पैशाच्या पुरवठ्याअभावी वीस हजार पुस्तके कमी छापली गेली. 'फुलमुनी आणि करुणा' या कादंबरीकरीता मात्र ११०० रूपये जमा झाले.[३०] ज्ञानोदयात 'यमुनापर्यटन'बद्दल वाचकांनी पत्रे लिहिलेली दिसतात. 'एक ख्रिस्ती' या नावाने लिहिलेल्या पत्रात विधवाविवाहाचा प्रश्न घेऊन बाबा पदममानजींनीं 'यमुनापर्यटन' लिहिली; पण लोकांनी त्यांची फार निंदा केली.[३१] असे म्हटले आहे. १५ सप्टेंबर १८५९ च्या ज्ञानोदयाच्या अंकात या कादंबरीचे गौरवपूर्ण वर्णन करून हा ग्रंथ म्हणजे मराठी भाषेस अमोल लाभ होय. शाबाथ शाळांच्या पुस्तक-संग्रहात हा ग्रंथ नेहमी ठेविला पाहिजे. असे ग्रंथ

आणखी शंभरपट व्हावेत.[३२] असा अभिप्राय व्यक्त केला आहे.

१९ व्या शतकामध्ये सामाजिक, राजकीय जीवनावर प्रभाव टाकणाऱ्या लोकांची चरित्रे उपलब्ध आहेत. या चरित्रांमधूनही तत्कालीन कादंबरीविषयक काही माहिती मिळते. या लोकांनी कोणत्या प्रकारच्या कादंबऱ्या आवडीने वाचल्या, याबद्दलचे ओझरते उल्लेखही आढळतात. या सगळ्या सामग्रीतून काही प्रमाणात कादंबरीविषयक अभिरुचीचा वेध घेता येतो.

न. र. फाटक यांनी लिहिलेल्या लोकमान्य टिळकांच्या चरित्रामध्ये एक प्रसंग आहे. टिळकांचे जवळचे स्नेही 'नाट्यकथार्णव' कर्ते शंकर मोरो रानडे अकाली वारले. त्यांची सांपत्तिक स्थिती चांगली नव्हती. त्यांनी एक 'शिलादित्य' नावाची कादंबरी लिहावयास घेतली होती. त्या कादंबरीत रोमन-प्रॉटेस्टंट यांच्या द्वंद्वाच्या नमुन्यावर हिंदू-जैन संघर्ष रानडे चितारीत होते. या विषयाला कोणते इंग्रजी वाङ्मय उपयोगी पडेल यासंबंधी टिळकांनी लिहून ठेवले होते. रानडे यांच्या मृत्यूमुळे कादंबरी अपूर्ण राहिली. अपूर्ण राहिलेली कादंबरी टिळकांकडे होती. प्रकाशकांनी ती पुरी करण्याबद्दल टिळकांशी विचारविनिमय केला. तेव्हा खाडिलकरांनी ती पूर्ण करावी व प्रसिद्ध झाल्यावर नफ्याचा निम्मा वाटा रानड्यांची विधवा पत्नी व सून यांना दिला जावा, अशी योजना टिळकांनी केली. या प्रसंगातून टिळकांचे मित्रप्रेम आणि दिवंगत मित्राच्या कुटुंबाला मदत करण्याची प्रेरणा तर स्पष्ट होतेच; पण त्याचबरोबर कादंबरीच्या आशयाला उपयोगी पडणाऱ्या इंग्रजी वाङ्मयाची माहिती टिळक देतात.[३३] या अनुभवातून कादंबरीकडे पाहण्याचा त्यांचा प्रौढ आणि प्रगल्भ दृष्टिकोण लक्षात येतो. 'शिलादित्य' कादंबरीच्या उपोद्घातात गहन विषयांची रुची वाढवणे आणि कादंबरीच्या संबंधाने जो भ्रांतिमूलक समज निर्माण झाला आहे तो दूर करणे, असा उद्देश सांगितला आहे. स्थळ-काळाचे किंवा कृतीचे ऐक्य हेच मूलभूत तत्त्व स्वीकारून अभिप्राय नोंदविला आहे. हा अभिप्राय शंकर मोरो रानडे यांच्याऐवजी खाडिलकरांचा असण्याचीच शक्यता अधिक आहे.

आवडाबाई भिडे यांच्या 'सद्गुणमंजिरी' या चरित्रामध्ये तिची काही पत्रे दिली आहेत. २६ ऑगस्ट १८८७रोजी आपल्या मैत्रिणीला ती 'वेणू' ही कादंबरी वाचण्याची शिफारस करते. या कादंबरीचे कथानक थोडक्यात सांगून OH! It is Pretty story! असे उद्गार काढते. आपणही कादंबरी विकत घेतल्याचा आणि दुसऱ्या कोणालातरी वाचण्यासाठी दिल्याचाही उल्लेख या पत्रात आहे.[३४] १९व्या शतकातील स्त्रियांना कोणत्या प्रकारच्या कादंबऱ्या आवडत असतील, याचा एक अंदाज या पत्रावरून येतो. असाच अंदाज रमाबाई रानडे यांच्या आत्मचरित्रातील उल्लेखान्वये करता येतो. न्या. रानड्यांची स्मॉल कॉझ कोर्टाचे जज्ज म्हणून नेमणूक झाल्यावर त्यांना विविध ठिकाणी कामाच्या निमित्ताने जावे लागले. त्यातच कलकत्त्याला काही काळ मुक्काम करावा लागला. या काळात रानड्यांनी रमाबाईंना बंगाली वाचायला शिकविले. कलकत्त्याहून परत येताना 'विषवृक्ष', 'दुर्गेशनंदिनी', 'आनंदमठ' अशा काही कादंबऱ्या घेऊन आम्ही परत आलो, अशी माहिती रमाबाई देतात. या कादंबऱ्या त्या वेळी बंगालमध्ये सुप्रसिद्ध असल्या पाहिजेत. या तिन्ही कादंबऱ्यांची मराठीत भाषांतरेही १९व्या शतकात झाली होती, ही बाबही तत्कालीन अभिरुची प्रकट करणारी आहे.

काशीबाई कानिटकर स्वतः लेखिका होत्या. त्यांनी दोन कादंबऱ्या, काही कथा लिहिल्या तसेच 'आनंदीबाई जोशी' यांचे चरित्रही लिहिले. त्यांचे पती गोविंदराव कवी होते आणि व्यासंगी विद्वान होते. हरिभाऊ आपटे यांचा कानिटकर कुटुंबाशी घरोबा होता. ते नेहमी त्यांच्याकडे येत-जात असत. त्यांच्यात साहित्यविषयक चर्चाही होत असत. या सगळ्यामुळे काशीबाईंची वाङ्मयीन अभिरुची चोखंदळ झाली होती. आपल्या चरित्रात हरिभाऊंच्या कादंबऱ्यांबद्दल काशीबाई लिहितात, 'त्यांच्या कादंबऱ्यांत हा एक विशेष गुण आहे की त्यांचे व्यावहारिक निरीक्षण फार सूक्ष्म असते. पात्रांची भाषा, मुलांचे खेळ, मुलींची लहानपणी एकमेकींबरोबरील बोलणी, सासूबाईंचे तोंऱ्यातील वाक्प्रहार, अगदी जसे आपण चालत्याबोलत्या माणसांचे पाहतो तसेच ते त्यात वढलेले आहेत. आणि अशा या मार्मिकपणामुळेच त्यांना उत्तम कादंबऱ्या लिहिता आल्या.'[३५]

'करमणूक'मधून हरिभाऊंची 'पण लक्षात कोण घेतो!' ही कादंबरी क्रमशः प्रकाशित होत होती. तेव्हा

काशीबाईंनी तिच्याबद्दलचा अगदी बोलका अभिप्राय प्रकट केला होता. त्या म्हणतात 'करमणुकीचा अंक येईल केव्हां आणि तो आम्ही वाचून यमुनाची व गणपतरावाची पुढें काय हकीकत झाली हें कळेल केव्हां असें माझ्या मुलांना झालेलें असतें, व दर सोमवारी टपाल आधीं कोणाच्या हातीं पडते यासाठीं ती जपत असतात; व तो अंक घेऊन समईजवळ कोंडाळे करून ती सर्व वाचून करमणूक करून घेतात. याचप्रमाणे आम्ही मोठी माणसेंही ती गोष्ट लक्ष्य लावून वाचतो; व ती खरोखर घडलेली गोष्ट आहे असें आम्हांला वाटते.' काशीबाईंप्रमाणेच अन्य काही स्त्रीवाचकांनी 'पण लक्षात कोण घेतो!' या कादंबरीबद्दल आपली मते व्यक्त केली आहेत. रमाबाई रानडे म्हणतात, 'सर्वांच्या अनुभवाची व प्रिय अशी' - 'पण लक्ष्यांत कोण घेतो!' ही गोष्ट वाचून कित्येक बायकांना तर ती आपली लहानपणातील गोष्ट कोणी काही फेरबदल करून लिहिली आहे असे वाटल्यावाचून राहत नाही. तोच समज पुढेही काही ठिकाणी कायम राहतोच. सौ. शिरगांवकर (मुंबई) त्यांना या कादंबरीतील स्वभावाप्रमाणे अगदी हुबेहूब आहेत असे वाटते. ही कादंबरी मला फार आवडते. करमणुकेचा पुढचा अंक केव्हा येईल व त्यांतली ही कादंबरी केव्हा वाचीन असे मला झालेले असते. ती एकदा वाचल्याने कंटाळा येण्याजोगी नाही. तर जितक्यादा वाचावी तितकी थोडीच असे वाटणारी आहे, असे सौ. शिरगांवकर म्हणतात.

मनमाडच्या सौ. सरस्वतीबाई पंडित यांचा अभिप्रायही लक्षात घेण्याजोगा आहे. त्या लिहितात, 'खरोखर आम्ही बायका ज्याप्रमाणे आपल्या नवऱ्याशी वागत असतो त्याचे हुबेहूब चित्र वठवून दिल्याचे मासले या आत्मवृत्तांत जागोजाग पहाण्यांत येतात. अगोदरच ते आत्मवृत्त व त्यांत एका सुंदर स्त्रीकडून त्याचे वदविणे. मग काय विचारायचें' "आधींच सोन्याचे।। वरी जडावाचें।। लेणें श्रीमंताचे।। शोभिवंत" [३६] तत्कालीन स्त्रियांच्या जीवनाचे हुबेहूब चित्रण असल्यामुळे 'पण लक्षात कोण घेतो!' ही कादंबरी स्त्रीवाचकांना अतिशय प्रिय होती, असे या अभिप्रायांवरून स्पष्ट होते.

हरिभाऊ आपटे यांच्याप्रमाणेच नागेश विनायक बापट हे १९ व्या शतकामध्ये वाचकप्रिय लेखक होते. त्यांच्या 'पानिपतची मोहिम' [३७] या कादंबरीला राजाश्रय आणि लोकाश्रय मिळाला होता. श्रीमंत सरकार महाराज सयाजीराव गायकवाड व श्रीमंत छत्रपती शाहू महाराज करवीर सरकार यांनी या कादंबरीला उदार आश्रय दिला होता. का. ना. साने यांनी 'या ग्रंथांनी ऐतिहासिक कादंबऱ्यांत सर्वोत्कृष्ट भर पडणार असून तो सर्वमान्य होण्यास अभिप्रायाची जरुरीच नाही असा हवाला दिला आहे.' अनेक ठिकाणी या कादंबरीच्या वाचनाचे जाहीर प्रयोग केले. एका प्रयोगाचे वेळीं कोणा श्रोत्याने खूश होऊन लेखकाला पोशाख बक्षीस दिला. कादंबरीच्या या जाहीर वाचनाचे तत्कालीन वर्तमानपत्रांमध्ये जे पडसाद उमटले ते खालीलप्रमाणे -

१) केसरी : २८/५/१८९५, काल रोजी संध्याकाळी येथील हिराबागेत प्रसिद्ध मराठी ग्रंथकार रा. सा. नागेशराव विनायक बापट यांनी, त्यांनी रचिलेल्या 'पानपतची लढाई' या नावाच्या ऐतिहासिक कादंबरीतील काही निवडक भाग वाचून दाखविले. श्रोतृसमाज बराच मोठा जमला होता. रा. सा. बापट यांची लेखनशैली व वर्णन करण्याची शक्ती फारच प्रशंसनीय आहे व त्यांनी कालच्या प्रसंगी ती उत्तम प्रकारे व्यक्त केल्यामुळे आणखीही काही भाग वाचून दाखविण्याविषयी मंडळीने उत्सुकता दर्शविल्यावरून आज रोजी संध्याकाळी ५।। वाजता ते आणखी काही मनोरंजक भाग वाचून दाखविणार आहेत, तरी ही मनोरंजनाची अपूर्व संधी कोणी घालवू नये अशी आमची शिफारस आहे.

२) वैदर्भ : (अकोल) ता. ३१/३/१८९४; रावसाहेब नागेशराव विनायक बापट यांनी पानपतच्या लढाईचा इतिहास नवीन लिहिला आहे. त्यातील काही भाग मलकापूर येथे हायस्कूल ग्यादरिंगपुढे वाचून दाखविला. रावसाहेब नागेशराव हे प्रसिद्ध ग्रंथकार आहेत. जो भाग वाचून दाखविला, त्यावरून पाहता सदरहू ग्रंथ चांगला उतरला आहे.

३) श्रीसयाजी विजय : ता. २०/४/१८९५; गेल्या शनिवारी श्रीमंत दादासाहेब फडणीस यांच्या वाड्यात रा. सा. नागेशराव विनायक बापट यांनी स्वतः तयार केलेले "पानपतची लढाई" या पुस्तकातील कित्येक भाग वाचून दाखविले. वाचलेले भाग मजेदार वठले होते. भाऊसाहेब

व राधाबाई यांची भाषणे, सतीची हकीकत, वगैरे भाग फार चटकदार लिहिलेले होते. असो. नंतर अध्यक्षसाहेबांनी व्याख्यानकारास एक उत्तम प्रकारचा पोषाख बक्षीस देऊन जाहीर सन्मान केला.

ऐतिहासिक कादंबऱ्यांप्रमाणे किंबहुना त्याहीपेक्षा अधिक प्रमाणात अद्‌भुतरम्य कादंबऱ्या वाचण्याकडे तत्कालीन वाचकांचा कल होता. सन १८७१ साली प्रकाशित झालेल्या 'जिल्ब्लास चरित्र' या भाषांतरित कादंबरीच्या प्रस्तावनेत वि. जी. पागनीस म्हणतात, 'साधारणपणे वाचतां वाचतां जितकें समजलें व गोड वाटलें, तितक्यानेंच आनंद मानणाऱ्या वाचकांचा ग्रह बहुधा असा असतो की, अशा प्रकारच्या मनोरंजक लेखनांत बहुधा अद्‌भुत रसाची चंगळ असली पाहिजे. सांप्रत आपल्या लोकांत जे असे ग्रंथ वाचणारे आहेत, त्यात वर लिहिलेल्या प्रतीच्या लोकांची संख्या मोठी आहे.'[३८] पागनीसांचे म्हणणे खरे वाटावे अशीच एकंदरीत परिस्थिती होती, असे कादंबऱ्यांच्या आवृत्त्यासंबंधी जी माहिती मिळते त्यावरून लक्षात येते. 'मुक्तामाला' या कादंबरीच्या १८६१ ते १८९० या कालखंडात सहा आवृत्त्या निघाल्या. या कादंबरीचे गुजरातीत भाषांतर झाले. एवढेच नव्हे तर अनेक भाषांमध्ये तिची भाषांतरे झाली आहेत. असा उल्लेख आढळतो.[३९] हळबे यांच्या 'रत्नप्रभा' या कादंबरीच्यासुद्धा सहा वर्षांत दोन आवृत्त्या निघाल्या. मुक्तामालेच्या परंपरेतील 'मंजुघोषा' या अद्‌भुतरम्य कादंबरीच्या सन १८६७ ते १८७५ या काळात चार आवृत्त्या निघाल्या व १८८६ पर्यंत सहा आवृत्त्या निघाल्या. 'मंजुघोषा' कादंबरीचे यश लक्षात घेऊन ना. स. रिसबुडांनी 'विश्वासराव' या कादंबरीच्या प्रकाशनापूर्वीच उदार आश्रयदाते मिळविले. ४८ लोकांनी ही कादंबरी प्रकाशित होण्यापूर्वीच प्रत्येकी ५ रुपये आणि त्यांपैकी काहींनी तर १० रुपये देणगी दिली.[४०] १८६० ते १८७५ या कालखंडात 'मुक्तामाला', 'मंजुघोषा' यांच्या धर्तीवरच्या अनेक कादंबऱ्या लिहिल्या गेल्या. अशा प्रकारच्या अद्‌भुतरम्य कादंबऱ्यांची त्या काळात आवश्यकता का भासली? किंवा लोकांनाही त्या का आवडल्या? याबद्दल 'मंजुघोषा' या कादंबरीच्या प्रस्तावनेत नारो-सदाशिव रिसबुड यांनी आपले मत प्रकट केले आहे. ते म्हणतात, 'आपले सगळ्यांचे आयुष्य बहुधा एकाच क्रमाने यंत्रासारखे चाललें आहे. प्रत्येक मनुष्याच्या आयुष्यामध्ये मोठा, सर्व स्थिति बदलणारा जो प्रकार म्हणजे विवाहाविषयींची हल्लींची आपली रीत. ती तर केवळ आपल्यास लाज आणणारी आहे. त्या रीतीनें मूळचा विवाह करण्याचा उद्देश म्हणजे स्त्री-पुरुषांस एकमेकांपासून प्रीतीच्या योगाने मिळणारें सुख, पण तें तर अगदींच एकीकडे राहून हल्लीं एखाद्या मुलाचे लग्न झालें असतां लोक त्यास थट्टेने 'तुझ्या पायांत सव्वा मणाची बेडी पडली' असें जे म्हणतात तेंच वस्तुतः खरें झाले आहे. विवाह म्हणजे बाकीची जी स्नानसंध्यादिक नित्य कृत्यें त्यापैकीच एक विशेष महत्त्वाचे कृत्य आहे असे आपण मानीत आहों, त्याची खरोखर मातब्बरी काय याचा आपण विचार करीत नाही. व हा विचार न केल्यामुळे आपलें आयुष्य चमत्कारिक रीतीने सगळ्यांचे अगदी एकसारखे होऊन गेले आहे.'[४१] त्या काळामध्ये सामाजिक आणि धार्मिक संस्थांच्या कर्मठपणामुळे माणसांच्या स्वातंत्र्याचा संकोच होऊन जीवन रूक्ष, कंटाळवाणे आणि साचेबंद झाले होते. या सगळ्यामुळे जगण्याला आलेला भणंगपणा सुसह्य व्हावा म्हणून अद्‌भुताचीच आवश्यकता होती, असा रिसबुडांच्या अभिप्रायाचा आशय आहे. अद्‌भुतरम्य कादंबऱ्यांची निर्मिती आणि लोकप्रियता याकडे केवळ अनुकरण असे म्हणून दुर्लक्ष करून चालणार नाही. श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांनी तर ही अद्‌भुतरम्यता आणि श्रृंगारिक वर्णनांची रेलचेल हे उर्दू, फार्सी वाङ्मयीन परंपरेचे अनुकरण आहे असा अभिप्राय व्यक्त केला आहे.[४२] केवळ अनुकरण आहे असे म्हणणे किंवा कशाचे अनुकरण आहे याबद्दल तर्क करणे पुरेसे नाही तर अद्‌भुत आणि श्रृंगारिक वर्णने असलेल्या या कादंबऱ्या कोणत्या प्रकारच्या सांस्कृतिक गरजेतून निर्माण झाल्या, याचा विचार करणे आवश्यक ठरते आणि रिसबुडांनी त्यावर नेमके बोट ठेवले आहे.

कादंबरी हा वाङ्मयप्रकार सामाजिक आशय व्यक्त करणारा असल्यामुळे विशिष्ट विषयांवर कादंबरीलेखन करण्यासाठी त्या काळात पारितोषिके ठेवली जात. दक्षिणा प्राईज कमिटीने सन १८५७ सालच्या बंडाविषयी ऐतिहासिक कादंबरी लिहिणाऱ्यांस बक्षीस मिळेल अशी

जाहिरात प्रसिद्ध केली व विष्णू जनार्दन पटवर्धन यांच्या '१८५७ सालचे बंडाची धामधूम किंवा हंबीरराव आणि पुतळाबाई' या कादंबरीला ते मिळाले.[४३] लक्ष्मीबाई टिळक यांच्या 'स्मृतिचित्रे'मध्ये ख्रिस्ती समाजनिदर्शक विषयावर स्वतंत्र मराठी कादंबरी लिहिणाऱ्यासाठी १५० व ५० रुपयांची बक्षिसे ठेवल्याचे सांगितले आहे. ही घटना जरी सन १९१७ मधली असली, तरी या प्रकारची बक्षिसे यापूर्वीही ठेवली जात असावीत, असा तर्क करता येतो. बक्षिसांसाठी कोणते विषय दिले जात होते, यावरूनही काही प्रमाणात तत्कालीन वाचकांच्या अभिरुचीचा अंदाज बांधता येतो.

१९ व्या शतकातील साधारण लोकमतं विलक्षण, परस्परविरोधी अशा आवडीनिवडींमध्ये गुंतून राहिलेले दिसते. त्या काळात 'मुक्तामाले'च्या अनेक आवृत्त्या निघाल्या आणि अनेक कादंबरीकारांनी तिचे अनुकरणही केले. रिसबुडांच्या 'विश्वासराव' कादंबरीला ती प्रसिद्ध होण्याआधीच देणगीदार मिळाले हे जितके बोलके चित्र आहे, तितकेच 'यमुनापर्यटन'च्या अखेरीस दिलेल्या पुस्तक खरेदी करणाऱ्यांच्या यादीचे चित्रही बोलके आहे. या यादीत डी. डायरेक्टर ऑफ पब्लिक इंस्ट्रक्शन यांनी शंभर प्रती घेतल्याची नोंद आहे. पुढे अनेक व्यक्तींनी कमीत कमी एक तर जास्तीत जास्त चोवीस प्रती घेतल्याची नोंद आहे. मुंबई, पुणे, नागपूर, बेळगांव, नळदुर्ग या गावांमधील लोकांनी ही खरेदी केली आहे असे या यादीवरून समजते.[४४] इंग्रजी शिक्षण घेतलेले आणि ख्रिश्चन झालेले किंवा ख्रिश्चन धर्माकडे ओढले गेलेल्या, कल असलेल्या लोकांची आवडनिवड यातून दिसून येते.

नव्याने शिक्षित झालेल्या, इंग्रजी कादंबऱ्यांना आणि साहित्यविचारांना परिचय असलेल्या लोकांची कादंबरी-विषयक अभिरुची कशा प्रकारची होती याचा एक अंदाज वर निर्देशिलेल्या, परीक्षणे, अभिप्राय, प्रस्तावनांमधील मजकूर, जाहिरातीमधील मजकूर तसेच वृत्तपत्रांमधील मजकूर यांच्या आधारे करता येतो. तत्कालीन सुशिक्षितांची ही मनोरंजनविषयक कल्पना म्हणावी लागेल अर्थात यावरून १९ व्या शतकातील सर्व मराठी माणसांच्या मनोरंजनविषयक कल्पनेचा अंदाज करणे बरोबर होणार नाही. मूठभर सुशिक्षितांच्या पलीकडे फार मोठा मराठी समाज त्या वेळी अस्तित्वात होता. कीर्तन, प्रवचन, सोंगी-भजने, भारुडे यांसारख्या धार्मिक विधिनाट्यांबरोबर अन्य काही मनोरंजनाचे प्रकार त्याला आकृष्ट करीत होते. 'मुंबईचे वर्णन' या पुस्तकात अशा लोकांच्या मनोरंजनाच्या साधनांची माहिती दिली आहे. 'मुंबई शहरांत प्रतिदिवशी अनेक तऱ्हांचे नाच तमासे रस्तोरस्तीं दृष्टीस पडतात. गारुडी, भोरपी (बहुरुपी), माकडांचे व अस्वलांचे नाच करणारे, व दुसरे तमासगीर लोक अनेक सोंगे घेऊन जिकडेतिकडे फिरत असतात, आणि आठ चार आणे दिले म्हणजे तमासा करून दाखवितात. परंतु युरोप खंडांतून जे प्रतिष्ठित गारुडी व तमासगीर येतात, ते दोन चार महिने एथें राहून दहावीस हजार रुपये गोळा करून जातात. ते कांपाच्या मैदानांत व दुसऱ्या एखाद्या प्रशस्त ठिकाणी जागा तयार करून तमासे करितात, घोड्यांवर नाचणें व त्यावर उभे राहून घिरट्या घालणें, चक्कर मारणें, असे अनेक तऱ्हांचे कसरतीचे खेळ करितात. व दुसरे गारुडी व जादूगिरी म्हणतात तसे हरतऱ्हांचे खेळ करितात. हे पाहण्यास जाणाऱ्या प्रत्येक मनुष्याकडून एकरुपयापासून पांच रुपयेपर्यंत घेतात आणि अशाच ठिकाणीं आमचे लोक संतोषानें द्रव्य खर्चितात. असे कोणी तमासगीर लोक आले, म्हणजे मुंबईतील लोकांस मोठें स्फुरण येतें. युरोपियन लोक सर्व गोष्टींत कुशल असून धूर्त असल्यामुळें जे काम ते हाती घेतात, त्यांत द्रव्य कमावितात. हे तमासगीर लोक बहुधा फ्रान्स, इटली व इंग्लंड इथून येत असतात.'[४५] मुंबईतील दुसऱ्या प्रकारच्या लोकांची करमणुकीबद्दलची अभिरुची अशी होती. नव्यानेच साहित्यविश्वात प्रविष्ट झालेल्या आणि केवळ सुशिक्षितांसाठीच निर्माण झालेल्या 'कादंबरी'विषयक अभिरुचीपेक्षा ती निश्चितच आणि पुष्कळच भिन्न होती. नव्या प्रकारची अभिरुची असलेला एक गट कादंबरीने निर्माण केला, असे म्हटले तर चुकीचे ठरणार नाही.

संदर्भ :


१. श्री. व्यं. केतकर, 'महाराष्ट्रीयांचे काव्यपरीक्षण अथवा महाराष्ट्रीय वाङ्मयाभिरुचीच्या इतिहासातील एक प्रकरण', विभाग १, पृ. ३.






२. शरद गोगटे, 'मराठी ग्रंथप्रकाशनाची २०० वर्षे', राजहंस प्रकाशन, पुणे, २००८, पृ. ११५, ११६.

३. म. गो. रानडे, मिसलेनियस रायटिंग्ज, प्रकाशक – रमाबाई रानडे, मुंबई, सन १९१५, पृ. १ ते ५६.

४. विविधज्ञानविस्तार पुस्तक २९, अंक ७, पृ. क्र. २००.

५. मोती बुलासा, डॉ. विद्यागौरी टिळक, डॉ. द. दि. पुंडे (संपा.) 'मराठी वाङ्मयाची सद्यःस्थिती', स्नेहवर्धन पब्लिशिंग हाऊस, पुणे, प्रथमावृत्ती, १९९८ मधून, पृ. ५५.

६. बलराम नंदा (अनु. वसंत पळशीकर) गोपाळ कृष्ण गोखले, ब्रिटिश राजवट व भारतीय 'नेमस्त युग' विभाग, विश्वकर्मा साहित्यालय, पुणे १९८६, पृ. ५१.

७. का. बा. मराठे, 'नावल म्हणजे काय?' निवडक मराठी समीक्षा (गो. मा. पवार, म. द. हातकणंगलेकर संपा.) साहित्य अकादमी, १९९९, पृ. १ ते ११.

८. विविधज्ञानविस्तार, पुस्तक १०, अंक ३, १८७८, पृ. ६०, ६१.

९. वि. का. राजवाडे, गो. मा. पवार/म. द. हातकणंगलेकर (संपा.) 'कादंबरी', उनि. पृ. २३ ते ३८.

१०. रा. के. लेले, 'मराठी वृत्तपत्रांचा इतिहास', कॉन्टि-नेन्टल प्रकाशन, पुणे ३०, दुसरी आवृत्ती २००४, पृ. ६.

११. श्री. कृ. कोल्हटकर, विविधज्ञानविस्तार – 'पण लक्षात कोण घेतो!' कादंबरीवर अभिप्राय, वर्ष – १८९४, पुस्तक २६ वे, अंक १ व २.

१२. विविधज्ञानविस्तार, 'पुष्पकरंडक' कादंबरीवरील पुस्तकपरीक्षा सन-१८९०, पुस्तक २२ वे, अंक ८ वा.

१३. रावजी शास्त्री गोडबोले, '१८५७ सालचे बंडाची धामधूम किंवा हंबीरराव आणि पुतळाबाई' प्रकाशक इंदुप्रकाश, मुंबई सन १८८५, पृ.१ ते३.

१४. टामस क्वांडी (अभिप्राय), तत्रैव, पृ. ३ ते ४.

१५. महादेव गोविंद रानडे (अभिप्राय), तत्रैव, पृ.४ ते ५.

१६. गो. मा. पवार/म. द. हातकणंगलेकर (संपा.), 'निवडक मराठी समीक्षा', प्रस्तावना, पृ. २.

१७. विविधज्ञानविस्तार, 'विश्वासराव' कादंबरीवरील अभिप्राय, सन १८७०, पुस्तक ३ रे, अंक ६ वा, पृ. ९१ ते ९५.

१८. अरुण टिकेकर, 'रानडे प्रबोधन-पुरुष तो वैचारिक वारसा विस्मृतीत का गेला?' अनु. विजय तापस, प्रस्तावना अनु. मनीषा टिकेकर, श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०, सन २०००, पृष्ठ क्र. ८९.

१९. नी. ज. कीर्तने, 'घाशीराम कोतवाल', शालापत्रक, अंक ३, ४, सन १८८३, पान नं. २२५.

२०. विविधज्ञानविस्तार, 'विषवृक्ष' कादंबरीवर पुस्तक परीक्षा - पुस्तक ३० वे, अंक १ ला, सन १९०० पृ. ७ ते १४.

२१. केरळकोकिळ, 'शिक्षक', पुस्तक क्र. ४, अंक ६ वा, वर्ष १८९३ शके १८११, पृ. क्र. १४२.

२२. 'प्रेमबंधन वरील अभिप्राय' विविधज्ञानविस्तार – पुस्तक, अंक ११ वा, सन १९७३, पृ. २१४ ते २२० व २३३ ते २३७.

२३. 'विश्वासराव' कादंबरीवरील अभिप्राय, 'विविध-ज्ञानविस्तार', सन १८७०, पुस्तक ३ रे, अंक ६ वा, पृ. ९३ ते ९४.

२४. 'छत्रपती संभाजी महाराज' कादंबरीवर अभिप्राय, 'निबंधचंद्रिका', अंक २९ वा, ३० वा, सन १८९५, पृ. १ ते २२.

२५. नरहर रघुनाथ फाटक, 'महादेव गोविंद रानडे', प्रकाशक–स्वतः लेखक, मुंबई, सन १९२४ पृ. ७२ मधून उद्धृत.

२६. म. ग. रानडे, अभिप्राय, 'शामभट्ट' (एक नामांकित जोशी आणि त्याचा शिष्य बटो यांचा वृत्तांत 'डॉन क्विक्झोट'च्या धर्तीवर भाग १ ते ३, प्रकाशक – 'वरदा', पुणे, सन १९९०, पृ. ५.

२७. विष्णुशास्त्री चिपळूणकर, 'निबंधमाला', खंड पहिला, वरदा बुक्स, सन १९९३, पृ. १४२.

२८. विष्णुशास्त्री चिपळूणकर, तत्रैव, पृ. ३५६.

२९. विष्णुशास्त्री चिपळूणकर, तत्रैव, पृ. ६२७.

३०. (संपादक) डॉ. गंगाधर ना. मोरजे 'ज्ञानोदय' लेखन सारसूची, खंड पहिला, भाग पहिला, पृ. १७९.

३१. (संपादक) डॉ. गंगाधर ना. मोरजे, 'ज्ञानोदय' लेखन सारसूची, खंड पहिला, भाग पहिला पृ. २५४.

३२. (संपादक) डॉ. गंगाधर ना. मोरजे, तत्रैव, पृ. ६४.

३३. नरहर रघुनाथ फाटक, 'लोकमान्य', मौज प्रकाशन गृह, सन २० जुलै २००६, मुंबई पृ. २९६.

३४. ग. ज. आगाशे, 'सद्‌गुणमंजिरी', आर्युभूषण छापखाना, पुणे, पृ. ११२.

३५. सरोजिनी वैद्य, 'श्रीमती काशीबाई कानिटकर' (आत्मचरित्र आणि चरित्र) (१८६१-१९४९) पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, सन १९९१, पृ. १३४.

३६. करमणुक पुरवणी, पृ. क्र. १ व २, नोव्हेंबर १८९२-९३ 'पण लक्षात कोण घेतो' या गोष्टीवरील अभिप्राय.

३७. नागेश विनायक बापट, 'पानपतची मोहीम', वरदा प्रकाशन, पुणे, सन १९९१.

३८. विष्णू जीवाजी पागनीस, 'जिलब्लास चरित्र', नॅशनल छापखाना, मुंबई, सन १८७१ पृ. क्र. १ ते ६ प्रस्तावना.

३९. लक्ष्मण मोरेश्वरशास्त्री हळबे, 'रत्नप्रभा', प्रकाशक- मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, सन १९६६, प्रस्तावना पृ. ३ ते ७.

४०. नारो सदाशिव रिसबुड, 'मंजुघोषा', प्रकाशक– मॉडर्न बुक डेपो, पुणे, सन १९६२, प्रस्तावना पृ. १ ते १३.

४१. नारो सदाशिव रिसबुड, तत्रैव.

४२. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर (मराठी कथात्मक वाङ्मय), विविधज्ञानविस्तार, पुस्तक ४३ वे, अंक १ व २.

४३. विष्णू जनार्दन पटवर्धन, '१८५७ साले बंडाची धामधूम किंवा हंबीरराव आणि पुतळाबाई, इंदुप्रकाश छापखाना, मुंबई, सन १८९५ प्रस्तावना पृ. क्र. १ ते २.

४४. बाबा पदमनजी, 'यमुनापर्यटन', स्नेहवर्धन प्रकाशन पुणे, सन १९९४, वर्गणीदारांची यादी, पृ. १२० ते १२२.

४५. गोविंद नारायण माडगांवकर, 'मुंबईचे वर्णन', वरदा बुक्स, पुणे, सन २००२, पृ. २९८.


☆☆☆



अनुक्रमणिका






लेखांक - २

# नवशिक्षणाची नांदी

## The Process of Education - Bruner

प्रा. रमेश पानसे




द प्रोसेस ऑफ एज्युकेशन (१९६०) हे ब्रुनरचे गाजलेले पुस्तक. वास्तविक हे स्वतंत्र पुस्तक नाही. १९५९ सालच्या सप्टेंबर महिन्यात, अमेरिकेत भरविण्यात आलेल्या 'वुडस्होल कॉन्फरन्स'मध्ये पस्तीस शास्त्रज्ञ, शिक्षणतज्ज्ञ दहा दिवस एकत्र बसले व त्यांनी भौतिक शास्त्रांच्या अभ्यासक्रमाचा सविस्तर विचार केला. ही सारी चर्चा जेरोम ब्रुनर यांच्या अध्यक्षतेखाली झाली होती. त्यामुळे तिचा अहवालही त्यांनीच लिहिला व तो या पुस्तकरूपाने प्रसिद्ध करण्यात आला.

ब्रुनरचे हे अहवालरूपी पुस्तक अक्षरशः अनपेक्षित-रीत्या जगभर गाजले. त्यांची भाषांतरे अगदी रशिया, जपानमध्येही झाली. सतरा वर्षांनंतर, १९७७ साली, या पुस्तकाची नवी आवृत्ती प्रसिद्ध करण्यात आली. त्याला ब्रुनरने एक नवी प्रस्तावना लिहिली आहे. या प्रस्तावनेत ब्रुनरने, पारंपरिक शिक्षणविचाराला कलाटणी देणारी नवी भूमिका प्रथमतः मांडली. ही भूमिका, त्याच्या शब्दांत थोडासा नवीन आशय भरून, आज, आपल्याला, आपल्या परिस्थितीत स्वीकारण्यास योग्य अशीच आहे. ब्रुनरने म्हटले आहे,

"…. गेल्या अर्धशतकात, ज्ञान इतके वेगाने वाढले आहे की कोणाही विचारी माणसाला, विशेषतः ज्याला शिक्षणात रस आहे त्याला, हे सारे अफाट ज्ञान, नव्या पिढीने आत्मसात करावे म्हणून ते त्यांच्यापर्यंत पोचवण्या-साठी नव्या मार्गांचा अवलंब केला पाहिजे. त्यासाठी शिकविण्याचा आब बदलला पाहिजे. मूळ तत्त्वे, त्यांमागची गृहिते, त्यांतून निघालेले विषय यांच्यावर शिकविण्यात भर दिला गेला पाहिजे. आपण मुलांना भौतिकशास्त्राविषयी बोलण्यापेक्षा भौतिकशास्त्रच बोलते केले पाहिजे. अर्थात् असे करण्यात असलेल्या अडचणी आजच आपल्याला ज्ञात आहेत. परंतु जर आपल्याला ज्ञान पुढे पोचवायचे असेल आणि बौद्धिक कौशल्य निर्माण करायचे असेल तर हा एकमेव अर्थपूर्ण असा दृष्टिकोण उपलब्ध आहे."

अशा प्रकारे दृष्टिकोणात बदल करावयास सांगताना, ब्रुनर यांनी, तत्कालीन उपलब्ध असे, मुलांच्या शिकण्या-विषयीचे संशोधनसारच पुढे सांगितले आहे. ब्रुनर लिहितात, "हे उद्दिष्ट समोर ठेवून आखलेला अभ्यासक्रम हा 'चक्रगती (Sprial) अभ्यासक्रम' होता. प्रश्नांचा शोध घेऊ पाहणारा मुलगा समोर ठेवून, त्याची स्वतःची असलेली विचारपद्धती लक्षात घेऊन त्याच्या विचाराच्या नैसर्गिक पद्धतीला साजेशी अशी ज्ञानवितरणाची पद्धत असणार होती. जिथे शिकते मूल असेल, तेथून सुरुवात करायची. आणि जेव्हा केव्हा ते शिकायला उद्युक्त होईल, तेव्हा त्याला ते (ज्ञान) मिळू द्यायचे. या भूमिकेतून मग मी असे म्हटले की, कोणत्याही मुलाला, कोणताही विषय, कोणत्याही वयाला, कोणत्या ना कोणत्या पण प्रामाणिकपणे अवलंबलेल्या पद्धतीने शिकविता येईल. शिकणाऱ्याच्या क्षमतेचा अंदाज घेऊन, प्रश्नाचा जो कोणता धागा त्याच्याशी जुळेल, तो तसा जुळवणे, हे या विधानामागचे सूत्र होते."

या वुडस्होल कॉन्फरन्सचे वैशिष्ट्य असे होते, की (तत्कालीन अमेरिकेतील) बदलत्या परिस्थितीच्या पार्श्वभूमीवर शिक्षणाविषयी नव्याने विचार करण्यासाठी भौतिकशास्त्र, शरीरविज्ञान, गणित, इतिहास, मानसशास्त्र आणि शिक्षण या अभ्यासविषयांतील तज्ज्ञ एकत्र आले होते. शिकण्याच्या प्रक्रियेचे स्वरूप आणि त्याचा शिक्षणाशी-शिक्षणव्यवहाराशी असलेला संबंध हा त्यांच्या चर्चेचा विषय होता आणि शिक्षणक्रम (curriculum) नव्याने तयार करण्यात शिकणे-शिकविणे यांबाबत जे काही

अनुक्रमणिका

नवे प्रश्न उद्‌भवले होते, त्यांकडे नव्या दृष्टीतून पाहण्याचा त्यांचा प्रयत्न होता.

**शिकण्याचे महत्त्व :**

या ग्रंथाच्या पहिल्या प्रकरणात या कॉन्फरन्समधील चर्चेची (आणि या ग्रंथाचीही) ओळख करून देण्यात आली आहे. एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीपर्यंत, शिक्षणाचे एक उद्दिष्ट म्हणून व्यक्तीची, 'सर्वसामान्य समज' वाढविण्यावरचा भर दिला गेला होता. विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात हा रोख बदलला आणि त्याच्या जागी 'कौशल्यवृद्धी'ला महत्त्व प्राप्त झाले. विसाव्या शतकाच्या मध्याला, म्हणजे जेव्हा ही वुडस्‌होल कॉन्फरन्स भरत होती, त्या काळात, विद्यार्थ्यांमधील सर्वोत्कृष्टता (excellence) वृद्धिंगत करण्यावर लक्ष केंद्रित झाले होते. मात्र याचा सर्वसामान्य अर्थ, हुशार मुलांवर लक्ष पुरवणे असा जो होता, त्यात या कॉन्फरन्स-मध्ये बदल करण्यात आला. शाळांमधील प्रत्येकच मुली-मुलाला, त्यांच्या बौद्धिक उत्कृष्टतेच्या पर्याप्त पातळीपर्यंत नेणे, याकडे या कॉन्फरन्समध्ये लक्ष वळविले. याला कारण घडले ते म्हणजे, मानसशास्त्रामध्ये प्रसृत झालेले नवे संशोधन व त्यावर आधारित असे नवे शिक्षणविषयक विचार. १९६० पूर्वीच्या दोन-अडीच दशकांमध्ये, मानस-शास्त्राच्या क्षेत्रांत, मुलांच्या शिकण्याचे स्वरूप आणि शिकलेल्या बाबींचे संक्रमण (Transfer) यांवर बरेच संशोधन झाले होते. त्यामुळे शिक्षणात, मुलांना 'शिकविण्या'पेक्षा त्यांच्या 'शिकण्या'वर भर द्यावा, हा विचार बळावू लागला होता. एवढेच नव्हे तर मुलांना स्वतःहून शिकण्याला प्रवृत्त केल्याने, मुले 'शिकावे कसे हेही शिकतील', हेही लक्षात येऊ लागले होते. साहजिकच, त्याचे पर्यवसान अभ्यासक्रमामधील विषयांच्या गाभ्यातील संरचना (Structure) समजावून घेण्यावर व त्याकरवी विषयांचे नेमके आकलन करून घेण्यावर व समजलेल्या घटकांचे अन्य परिस्थितीत वा व्यवहारांत संक्रमण करता येण्यावर भर देण्यात आला होता.

**शोधवृत्तीचे भान :**

या ग्रंथाच्या दुसऱ्या प्रकरणात, विद्यार्थ्यांच्या शिकण्यामध्ये विषयांचा गाभा व त्याची नेमकी संरचना यांचे महत्त्व काय आहे, आणि त्याला शिकविण्याच्या प्रक्रियेत मध्यवर्ती स्थान कशा प्रकारे देता येईल, याच्या-विषयीचे विवेचन आले आहे.

शिक्षणाचा मुख्य उद्देश, विद्यार्थ्यांना ते त्यांच्या भविष्य-काळात उपयोगी पडावे असा असतो. यासाठी मिळालेल्या ज्ञानाचे संक्रमण विद्यार्थ्यांना करता आले पाहिजे. हे घडून येण्याचे दोन मार्ग किंवा दोन प्रकार, ब्रुनर यांनी सांगितले आहेत. एक आहे, तो म्हणजे विद्यार्थ्याला प्रत्यक्षात जे आणि जसे शिकविले असेल तशाच परि-स्थितीत, त्याच पद्धतीने ते ज्ञान उपयोगात आणणे. याला ब्रुनर यांनी 'विशिष्ट संक्रमण' (Specific Transfer of Teaching) असे म्हटले आहे. दुसरा, त्यांनी सांगितलेला प्रकार म्हणजे 'अविशिष्ट संक्रमण' (Non-Specific Transfer). यात, विषयाची गाभाभूत तत्त्वे (Principles) व त्यांच्या आकलनातून निर्माण झालेली वृत्ती (Attitudes) यांचे संक्रमण होते. या प्रकारचे म्हणजे अविशिष्ट संक्रमण होणे हीच गोष्ट शैक्षणिक प्रक्रियेत घडून येण्याची अपेक्षा असते. शिक्षणक्रम आखताना याची दखल कशी घ्यायची हाच शिक्षणाविषयीचा खरा प्रश्न असतो, आणि ही गोष्ट कठीण असते.

ब्रुनर यांनी, या अविशिष्ट संक्रमणाचे उद्दिष्ट समोर ठेवून शिक्षणक्रम तयार करताना येणाऱ्या दोन संभाव्य अडचणींचा उल्लेख केला आहे. एक म्हणजे, या पायाभूत मार्गाने शिकण्या-शिकविण्यासाठी साहित्य कसे निर्माण करावे हा, आणि दुसरे म्हणजे, हे साहित्य निर्माण करताना, त्याचा संबंध विद्यार्थ्यांच्या भिन्न वयोगटांतील वेगवेगळ्या पातळ्यांवरील क्षमतांशी घालून हे साहित्य कसे निर्माण करावे याचा. अर्थात् एकवेळ हा प्रश्न सोडविता तरी, आला आणखी एका प्रश्नाशी शिक्षणक्रम तयार करणारांना भिडावे लागणार आहे, याची जाणीव ब्रुनर यांनी येथेच करून दिली आहे. ब्रुनर म्हणतात, "एखाद्या क्षेत्रातील गाभाभूत तत्त्वे आत्मसात करण्यामध्ये, केवळ सर्वसामान्य तत्त्वेच समजावून घ्यायची नसतात; तर प्रत्यक्षात, त्यात शिकण्याच्या वृत्तीचा चौकस बुद्धीने अंदाज घेणे, शंका काढणे या गोष्टींचा विकास करून, स्वतःच्या समस्यांचं स्वतःच निराकरण करता येणे, या गोष्टींचा समावेश होतो." ब्रुनर यांनी विषयअभ्यासाच्या संदर्भातील या वृत्तिनिर्मितीच्या प्रश्नाला ठळकपणे पुढे

आणले आहे. कारण, अशा वृत्तिनिर्मितीच्या संदर्भात, केवळ शिक्षकाने विद्यार्थ्यांसमोर विषयाची गाभाभूत तत्त्वे ठेवणे, याहीपलीकडे काही करावे लागते. ब्रुनर यांच्या मते, यासाठी विद्यार्थ्यांमध्ये शोधकतेचे, शोधवृत्तीचे भान चेतवावे लागते. पूर्वी लक्षात न आलेला, दोन घटकांमधील परस्परसंबंध लक्षात येणे, किंवा दोन्हींमधील साम्य वा भेद यांचे आकलन होणे, त्यातून अखेरीस स्वतःच्याच क्षमतांचा शोध लागणे व त्यामुळे आत्मविश्वास वाढणे या साऱ्यांतून ही शोधवृत्ती जागृत होत असते. इथे मग विचारांची वाट येऊन पोचते ती एका मूलभूत समस्येकडे. ती म्हणजे, हे गाभाभूत तत्त्वांचे ज्ञान हे विद्यार्थ्यांच्या आवडी-निवडींशी आणि त्यांच्या नैसर्गिक क्षमतांशी कसे जोडता येईल? या प्रश्नाभोवतीचे विवेचन पुढील प्रकरणात विस्ताराने करण्यात आले आहे.

**विषयाची मध्यवर्ती संरचना :**

या प्रकरणाचा जो मुख्य विषय आहे, की मुलांना विषयांचे अध्ययन करताना, विषयांतील गाभाभूत तत्त्वे आकलन होतील अशी विषयाची मध्यवर्ती संरचना (Structure) त्यांना शिकविली जाणे. हा प्रयत्न कसा करावा याच्या विवेचनाबरोबरच तो का करावा, याचेही प्रतिपादन ब्रुनर यांनी केले आहे. त्यांच्या मते, चार प्रकारचे लाभ यांमुळे, प्रत्यक्ष शिक्षणात होऊ शकतात. एक म्हणजे, विषयाची मध्यवर्ती संरचना लक्षात आल्यामुळे विषयातील मूलभूत घटकांचे आकलन चांगले होते. दुसरा लाभ म्हणजे विषय नीट लक्षात राहतो. तिसरे असे, की यामुळे जे शिकले गेले आहे त्याचे संक्रमण पुरेशा प्रमाणात होऊ शकते. आणि चौथे म्हणजे, अशा प्रकारच्या प्रयत्नांतून प्राथमिक, माध्यमिक शाळांतून, वापरल्या जाणाऱ्या साहित्याचे सातत्याने परिशीलन होत राहते; व तसे ते राहिल्यामुळे प्राथमिक स्वरूपाचे ज्ञान आणि प्रगत होत असलेले ज्ञान यांमधील दरी कमी होत जाते.

प्रकरणाच्या अखेरच्या भागात, तत्कालीन म्हणजे पारंपरिक स्वरूपाच्या परीक्षापद्धतीविषयीची नाराजीही ब्रुनर यांनी व्यक्त केली आहे. 'परीक्षे'विषयी, ब्रुनर यांनी असे लिहिले आहे की, "परीक्षा ही विषयामधील अत्यंत किरकोळ अशा गोष्टींवर भर देत असल्यामुळे ती निखालसपणे वाईट ठरते. अशा परीक्षांमुळे तुटक-तुटकपणे शिकवायला आणि घोकंपट्टीने शिकायला उत्तेजन मिळते." मला स्वतःला, ब्रुनर यांचे हे १९६० साली केलेले विधान आजच्या घडीला आपल्या देशातील अजूनही टिकून राहिलेल्या पारंपरिक शिक्षणाच्या आणि त्यांमधील परीक्षांच्या संदर्भात कालोचित वाटते आहे.

**चक्राकार शिक्षणक्रम :**

दुसऱ्या प्रकरणात ज्याची चर्चा आली आहे असा शिक्षणक्रम नव्याने निर्माण केला गेला, तरी तो वेगवेगळ्या वयाच्या मुलांच्या बौद्धिक आवाक्यात कसा आणायचा? असाही एक प्रश्न जो निर्माण होतो. त्यावरील चर्चा हा तिसऱ्या प्रकरणाचा प्रमुख विषय आहे. तिसऱ्या प्रकरणात या प्रश्नाच्या अनुषंगाने तीन मुख्य कल्पनांचा उहापोह केलेला आहे. एक, बालकाचा बौद्धिक विकास; दोन, बालकाची प्रत्यक्ष शिकण्याची क्रिया; आणि तीन, त्यासाठीचा चक्राकार शिक्षणक्रम (Spiral Curriculum) यांपैकी पहिल्या दोन कल्पना ह्या 'मूल समजावून घेणे', याच्याशी संबंधित असून तिसरी कल्पना ही मुलांच्या नैसर्गिकतेशी जोडता येईल असा शिक्षणक्रम कसा असावा, याविषयीची आहे.

मूल समजावून घेण्याचा सर्व भाग हा प्रामुख्याने पियाजेच्या या संदर्भातील तत्कालीन ताज्या संशोधनांवर आधारलेला आहे. किंबहुना, पियाजेच्या सहकारी बारबेल इनहेल्डर यांच्या, कॉन्फरन्समध्ये सादर झालेल्या निबंधातील खूप दीर्घ उद्धृते हा या प्रकरणाचा मध्यवर्ती भाग बनला आहे. बालकाच्या बौद्धिक विकासाच्या पायऱ्या आणि प्रत्येक पायरीचे बालकाचे संभाव्य आकलन यांविषयीचे पियाजेचे संशोधन यांचा आधार लक्षात घेऊन बालकाची बौद्धिक-मानसिक पूर्वतयारी आणि त्याला आव्हान देईल अशी विषय शिकविण्याची शैली यांचा मिलाफ घडवून आणण्याचा विचार प्रामुख्याने या प्रकरणात मांडला आहे. त्यासाठी अर्थातच चक्राकार शिक्षणक्रम तयार करण्याची गरज प्रतिपादन केली आहे. शक्यतो मुलांच्या विशिष्ट पातळीच्या बौद्धिक तयारीशी मिळता-जुळता असा विषयाचा अभ्यासक्रम करायचा आणि शिक्षकाने तो राबवताना, येणाऱ्या अडचणींशी सामना देऊन त्यात गरजेनुसार

सुधारणा करत जायच्या व त्यातून त्या अभ्यासक्रमाचे सुधारित रूप साकार करायचे, अशा तऱ्हेची ही चक्राकार शिक्षणक्रमाची कल्पना आहे. मात्र, याविषयी उपलब्ध संशोधन फारसे नाही आणि ते करण्याची गरज आहे, अशी सूचना या प्रकरणाच्या अखेरीस, ब्रुनर यांनी केली आहे.

आतापर्यंतच्या तीनही प्रकरणांमधील विवेचन हे एका गृहीतावर आधारलेले आहे. हे गृहीत असे की, बौद्धिक क्रिया, मग ती लहान बालकाची असो अथवा प्रौढाची असो, ज्ञानप्राप्तीच्या सुरुवातीच्या अवस्थेतील असो किंवा उच्च ज्ञानप्राप्तीनंतरची असो; ती समानच असते. फरक असलाच तर तो स्वरूपाचा नसतो, तर प्रमाणाचा असतो.

मुलाची शिकण्याची तयारी असणे ही प्राथमिक बाब आहे. ही तयारी असणे हे मुलाच्या इच्छेवर अवलंबून असते; आणि मुलाची शिकण्याची इच्छा कशा प्रकारे वाढवावी हा शिक्षणातील एक कळीचा प्रश्न आहे. या प्राथमिक स्वरूपाच्या प्रश्नाचे तेवढेच प्राथमिक स्तरावरचे उत्तर ब्रुनर यांनी या ग्रंथाच्या प्रास्ताविकातच देऊन ठेवले आहे. जे काही शिकायचे म्हणून आहे त्याच्यात रस वाटणे हेच शिकण्यासाठीचे सर्वोत्तम उत्तेजन आहे; परीक्षेत गुण मिळणे किंवा भावी काळातील स्पर्धेला तोंड देण्याची तयारी होणे, ही बाह्य आकर्षणे विद्यार्थ्यांच्या बाबतीत फारसे काही साधत नाहीत. त्यामुळे, आता नवा प्रश्न निर्माण होतो तो, शिकण्यात रस कसा निर्माण व्हावा? हा. यावर या कॉन्फरन्समध्ये बरीच चर्चा झाली. आणि या एका साध्या प्रश्नाच्या आवाक्यात, शिक्षक-प्रशिक्षणापासून ते परीक्षेचे स्वरूप किंवा शिक्षणक्रमाचा दर्जा या साऱ्यांची चर्चा आली. ग्रंथाच्या चौथ्या नि पाचव्या प्रकरणात या चर्चेची दखल घेतली आहे.

**अंतःस्फूर्त व विश्लेषक विचारपद्धती :**

चौथे प्रकरण हे अंतःस्फूर्त (Intuitive) विचारपद्धती व विश्लेषक (Analytic) विचारपद्धती यांमध्ये असलेला फरक विशद करते. या प्रकरणाचे महत्त्वाचे प्रतिपादन असे आहे की, मुलांच्या उत्स्फूर्त विचारक्षमतेची काळजीपूर्वक तपासणी केली, तर त्याचा शिक्षणक्रम तयार करणाऱ्यांना आणि तो शिकविणारांना कितीतरी उपयोग होईल. आणि म्हणून, या प्रकरणात, ही अंतःस्फूर्त विचारपद्धती काय आहे आणि तिचा कशावर परिणाम घडून येतो, याची चर्चा केली आहे.

विश्लेषक म्हणजेच तर्कशुद्ध विचार हा एकेका पायरीने पुढे जात असतो. या पायऱ्या कोणत्या आहेत हे विचार करणाराला नेमकेपणाने ज्ञात असते. त्या पायऱ्या एकाकडून दुसऱ्याला कथन करता येतात. विश्लेषक विचाराच्या या पायऱ्या जाणीवपूर्वक घेतल्या जातात. त्यामध्ये विगमनाची (Inductive) किंवा निग-मनाची (Deductive) तार्किकता अनुस्यूत असते. मात्र अंतःस्फूर्तीने जो विचार उदयाला येतो, त्याची 'पद्धत' सर्वस्वी वेगळीच असते. त्याच्या काळजीपूर्वक आखलेल्या पायऱ्या नसतात. बहुधा, एखाद्या विषयाचे जे एक साकलिक आकलन असते, त्यातून एखादा आगळा-वेगळा विचार, एखाद्या प्रश्नावरील तोडगा अकस्मातपणे उदयाला येतो, सुचतो. ही सुचण्याची प्रक्रिया मात्र नेमकेपणाने सांगता येत नाही. या दोन्हीही पद्धती अस्तित्वात असतात व त्या शिक्षणात वापरता येतात.

विश्लेषक विचारपद्धती आणि अंतःस्फूर्त विचारपद्धती या दोन्हीही पद्धती परस्परपूरक असून त्या शिक्षणात उपयुक्त ठरतात, असे ब्रुनर यांचे प्रतिपादन आहे. विशेषतः लहान मुलांना औपचारिक, तार्किक पद्धतीकडे वळविण्यापूर्वी त्यांना शिक्षणसाधनांविषयी उत्स्फूर्त विचार मांडायला लावणे ही शिक्षणातील एक उपयुक्त पद्धती ठरते, असे तज्ज्ञांनी कॉन्फरन्समध्ये दिलेल्या उदाहरणांवरून तयार होणारे सर्वसामान्य मत, ब्रुनर यांनी येथे दिले आहे.

विद्यार्थ्यांनी स्वतः विचार करणे, आपल्या आधीच्या आकलनानुसार शोध घेणे, त्यातून काहीतरी नवा विचार सुचणे, व तो प्रस्थापित विचाराशी ताडून पाहणे याला शिक्षणशास्त्रात विचाराची 'नवगामी' अथवा 'स्व-शोधात्मक' (Heuristic) पद्धती असे म्हटले जाते. अंतिमतः समस्यानिवारणाकडे (Problem solving) नेणारी अशीच ही पद्धती असते. त्यामुळे तिचा शिक्षणात उपयोग करून घेणे इष्ट असते. विद्यार्थ्यांना, आपल्या अंतःस्फूर्तीला सजग करण्याचेही शिक्षण देता येऊ शकते. त्यासाठी विषयाची अंगभूत संरचना समजणे, तसेच, विषयातील घटकांचे परस्परसंबंध ज्ञात होणे उपयुक्त








ठरते.

या ग्रंथाच्या आतापर्यंतच्या भागात शिक्षणातील दोन मूलभूत घटकांचा ऊहापोह करण्यात आला आहे. एक म्हणजे 'शिकणे', म्हणजेच शिकण्याची प्रक्रिया व शिकण्याचे स्वरूप आणि दुसरा घटक आहे, 'संक्रमणा'चा. जे शिकले जाते त्याचे सहज संक्रमण करता यायला हवे, हा. यामध्ये असलेली गाभाभूत संरचनेची भूमिका, विद्यार्थ्यांची शिकण्याची तयारी असणे, शिकण्यात अंतः-स्फूर्तीचे महत्त्व आणि मुलांची शिकण्याची इच्छा कशी वाढवता येईल या चार घटकांची चर्चा पहिल्या प्रकरणात येऊन गेली आहे.

पाचव्या प्रकरणात, मुख्यत्वेकरून मुलांचा शिक्षणा-तील रस कसा वाढवता येईल, त्यासाठी शाळेतील वातावरण कसे सुधारता येईल; आणि याच्याच संदर्भात शिक्षक-प्रशिक्षण, दृक्-श्राव्य शैक्षणिक साधने, परीक्षांचे स्वरूप आणि शिक्षणक्रमाचा दर्जा या विषयांना स्पर्श करण्यात आला आहे.

या पाचव्या प्रकरणात प्रामुख्याने, अमेरिकेतील तत्कालीन परिस्थितीच्या पार्श्वभूमीवर, प्रत्यक्ष शिक्षणातील बदलांना कारणीभूत ठरणारे घटक विचारात घेतले आहेत. अमेरिकेत साधारणपणे १९५० पासून शिक्षणात काही प्रयोग करण्यास, काही वेगळी उद्दिष्टे समोर ठेवून त्यांच्या दिशेने शिक्षणाला वळविण्याचे प्रयत्न होण्यास सुरुवात झाली. त्यातही प्रामुख्याने भौतिकशास्त्राच्या संदर्भात काही नवे घडविण्याचा प्रयत्न होऊ लागला. मुख्य म्हणजे, दृष्टिकोणातच बदल होऊ लागला. केवळ काही हुशार मुलांवर लक्ष केंद्रित न करता, शिक्षणाचा सारा आब सर्वसाधारण मुलांना केंद्रस्थानी ठेवून आणि शिक्षणात समानता आणण्याचा हेतू ठेवून, शिक्षणाकडे नव्या दृष्टीने पाहिले जाऊ लागले. किंबहुना म्हणूनच, सर्वांनाच शिक्षणात रस कसा निर्माण होईल हे पाहण्याची गरज निर्माण झाली. शिक्षणात रस निर्माण झाला तर सर्वच मुले अधिक चांगले शिकू शकतील, हे लक्षात आले.

याच काळात, अमेरिकेत, करमणूकप्रधान संस्कृती सार्वत्रिकरीत्या पसरू लागली होती. विद्यार्थ्यांत त्याचे विलक्षण आकर्षण पसरू लागले होते. परंतु यातील 'निष्क्रियता' चाणाक्ष शिक्षणतज्ज्ञांच्या लक्षात येत गेली आणि शालेय वर्गांमधील शिक्षणात क्रियाशीलता आणण्याचे प्रयत्न होऊ लागले. दूरदर्शन आणि संगणक यांच्या आजच्या युगातील प्राबल्यामुळे मुलांचा फार मोठा वेळ शारीरिक हालचालीविना आणि बौद्धिक शोधकारितेविना जातो, याचा अनुभव आज आपण घेतच आहोत. समतोल राखण्यासाठी त्याला कृतिशील नि रसपूर्ण शिक्षणाची सांस्कृतिक फळी उभी करण्याचे प्रतिपादन येथेही केले आहे.

ग्रंथाच्या शेवटच्या प्रकरणात, शिकविण्यासाठी वापरता येतील अशा तांत्रिक व इतर साधनांचा व उप-क्रमांचा पुसटसा आढावा घेतला आहे. ग्रंथात उल्लेख केला आहे त्यापेक्षा कितीतरी अधिक नवनवीन शैक्षणिक साधने अलीकडच्या काळात निर्माण झाली आहेत. शिकविण्यापेक्षा शिकण्याच्या साधनांवर आज अधिक भर दिला जातो.

**नवविचारांची नांदी :**

ब्रुनर यांच्या या अहवालरूपी ग्रंथाबाबत काही निरीक्षणे नोंदवावीशी वाटतात.

या अधिवेशनात भाग घेतलेले विविध विषयतज्ज्ञ जवळजवळ सर्वच जण (अपवाद फक्त Barbel In-helder या पियाजेच्या सहकारी विदुषीचा) १९६० पूर्वीच्या शैक्षणिक विचारप्रवाहांचेच प्रातिनिधित्व करणारे होते. ब्रुनर यांनी स्वतःच उल्लेख केल्याप्रमाणे, बिहेवियरिझम, गस्टॉल्ट, सायकोमेट्रिक वगैरे विचारप्रवाहांचे प्रतिनिधी या कॉन्फरन्समध्ये हजर होते. वर्तनवादाचे आयुष्यभरचे खंदे पुरस्कर्ते बी. एफ. स्कीनर यांनीही एका विषयावरचे कृतिदर्शन (Demonstration) एका दुपारच्या सत्रात दिले. यामुळे, साहजिकच 'प्रचलित' शिक्षणविचारांचा प्रभावच या अधिवेशनावर होता.

असे असले तरी या पुस्तकाचे वर्णन, शिक्षणातील नवविचारांची नांदी करणारे पुस्तक म्हणून मी करीन. या माझ्या मताच्या समर्थनार्थ अधिवेशनातीलच एक-दोन सूचक घटनांचा उल्लेख करता येईल.

पहिली उल्लेखनीय बाब अशी की, या अधिवेशनात, पियाजेच्या जिनिवा स्कूलची बारबेल इनहेल्डर या अधि-वेशनात हजर राहिली होती व तिने लहान मुलांच्या विचार प्रक्रिये संदर्भातील जिनिवा गटाचे त्या वेळचे

अनुक्रमणिका

काम आपल्या शोधनिबंधाद्वारे सादर केले होते. याचाच परिणाम म्हणून कदाचित असेल, पण चर्चांसाठी जेव्हा सदस्य पाच गटांत विभागले गेले तेव्हा प्रचलित शिक्षणातील प्रमुख घटकांच्या संदर्भात जरी पहिले चार गट निर्माण केले असले, तरी पाचवा गट, खासकरून 'शिकण्यामधील आकलनप्रकिया' (Cognitive Process in Learning) या विषयावर चर्चा करणारा होता. म्हणजे, शिक्षण-विषयक नवविचारांत ज्याला आज मध्यवर्ती स्थान दिले जाते त्या 'मूल शिकते कसे' या विषयाला, इथल्या चर्चांमध्ये प्रथमतःच स्थान दिले गेले.

ब्रुनर स्वतः नवशिक्षणविचारांचे पुरस्कर्ते मानले जातात. त्यांनी अधिवेशनाचे अध्यक्ष या नात्याने पण तरीही स्वतःच्या वैयक्तिक दृष्टिकोणातून अधिवेशनाचे आशय सांगणारा हा (पुस्तकरूपी) अहवाल लिहिला आहे. या अहवालाचा कच्चा मसुदा लिहून झाल्यावर त्यांनी तो सर्व सदस्यांकडे अवलोकनार्थ आणि परीक्षणार्थ पाठविला होता. त्याला आलेल्या भरघोस प्रतिसादामध्ये, एक टीकात्मक प्रतिसाद असाही होता की, या अहवालात, ब्रुनरने, पियाजेने मांडलेल्या, मुलांच्या क्रियापूर्व अवस्थेतील (Pre-Operational stage) विचारप्रक्रियेचे, मूर्त-क्रियात्मक अवस्थेतील (Stage of Concrete operations) विचारांत होणारे संक्रमण (Transition) याला अतिमहत्त्वाचे स्थान देऊ केले आहे. मला हा टीकात्मक उल्लेख महत्त्वाचा वाटतो, तसेच तो योग्यही वाटतो. कारण, ब्रुनर स्वतःच त्या दिशेला आपल्या शिक्षणविचारात वळत होता याचेच हे द्योतक होते. असे म्हणायला वाव आहे कारण, या पुस्तकाची तब्बल सतरा वर्षांनंतर, १९७७ साली जी आवृत्ती प्रसिद्ध झाली, त्याच्या नव्या प्रास्ताविकात स्वतः ब्रुनर यांनी, स्वतःविषयी असे स्पष्टपणे म्हटले आहे की, "मागे वळून पाहताना मला दिसते की या तिघांचाही (पियाजे, चॉम्स्की व लेवी स्ट्रॉस) माझ्या विचारांवर विलक्षण प्रभाव पडला आहे." तसेच, एका वेगळ्या संदर्भात, सुद्धा, 'प्रोसेस ऑफ एज्युकेशन' या आपल्या पुस्तकाचे वर्णन, "हे पुस्तक बहुतांशी विद्यार्थ्यां-विषयी नि त्यांच्या शिकण्याच्या प्रक्रियांविषयी आहे", असे ब्रुनर यांनी केले आहे. आज आपल्यांला माहीत आहे की, मुलांच्या 'शिकण्या'चा व त्यांच्या शिकण्याच्या विविध नैसर्गिक प्रक्रियांचा विचार हाच नवशिक्षणाच्या गाभ्याचा विचार आहे.

The Process of Education : Jerome Bruner, Harvard University Press, Cambridge, Massachusetts, London, England (1960).

☆☆☆

## लेखकांचा परिचय

❋ **प्राचार्य डॉ. पंडितराव पवार**

मराठीचे निवृत्त प्राध्यापक. एम. ए., पीएच. डी. (मराठी); नाशिक जिल्हा मराठा विद्याप्रसारक समाज, नाशिक या संस्थेत ३० वर्षे प्राचार्य. पुणे विद्यापीठाचा उत्कृष्ट प्राचार्य म्हणून पुरस्कार. साहित्य व शिक्षण यांवर लेखन.

***पत्ता :–*** ६, ऋषिराज पार्क, अरिहंत नर्सिंग होमजवळ, गंगापूर रोड, नाशिक –४२२ ०१३.
भ्रमणध्वनी : ९४२३१८१०८७.

❋ **प्रा. डॉ. रोहिणी तुकदेव**

'मराठी कादंबरी'च्या अभ्यासक. 'नवभारत'च्या लेखक.

***पत्ता :*** जी १०३, खरे हौसिंग ग्रुप प्रॉजेक्ट, मु. पो. धामणी, सांगली ४१६ ४१६.
दूरध्वनी : ०२३३–२३०२१११

❋ **प्रा. रमेश पानसे**

प्रसिद्ध शिक्षणतज्ज्ञ. काही वर्षे अर्थशास्त्राचे पदव्युत्तर स्तरावरील प्राध्यापक, ग्राममंगल संस्थेकरवी आदिवासी भागात व अन्य ठिकाणी शिक्षणविषयक प्रयोग. आर्थिक, सामाजिक, शैक्षणिक व साहित्य विषयांवर विपुल लेखन. सुमारे ३० पुस्तके व ५०० च्या वर लेख.

***पत्ता :–*** ३१५, प्राज्ञपाठशाळा मंडळ, गंगापुरी, वाई ४१२ ८०३. भ्रमणध्वनी : ९८८१२३०८६९.

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# नवभारतास

# हार्दिक

# शुभेच्छा !



हे मासिक घ. वा. जोशी यांनी सन प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

अनुक्रमणिका